नवीनवस्त्रधारण॥ ॥रोहिणीषु करपंचके शिवभे त्र्युत्तरेपि चपुनर्वसुद्वये॥ रेवतीषु वसुदैवतेचभेनव्यवस्त्रपरिधानमिष्यते १

**अर्थ-** रोहिणी, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, अश्विनी, तीन्ही उत्तरा, पुनर्वसु, पुष्य, रेवती, धनिष्ठा ह्यांवर नवीन वस्त्र धारण करावें

मौत्यसुवर्ण,मणि,रक्तवस्त्रयांचेधारण॥ ॥नाम्यत्यपौष्णाव सुभकरपंचकेच मार्तंडभौमगुरुभार्गवशशांकवारे॥ मुक्तासुवर्णमणिविद्रुमदंतशंखरक्तांबराणिविधृतानिभवंतिसिद्ध्यै॥१

**अर्थ-** अश्विनी, रेवती, धनिष्ठा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा हीं नक्षत्रें आणि रवि, भौम, गुरु, शुक्र, सोम हे वार ह्यांवर मोत्यें, सुवर्ण, मणि, पोवळे, हस्तिदंताचे चुडे, तांबडीं वस्त्रें यांचें धारण व नवीन शंखाचीं काकणें घालणें हीं कृत्यें शुभप्रद होतात.

पुंसवनासनक्षत्रें॥ ॥श्रवणः सकरः पुनर्वसुर्निर्ऋतेर्भंचसपुष्यकामृगः॥ रविभूसुतजीववासराः कथिताः पुंसवनादिकर्मसु १

**अर्थ-** श्रवण, हस्त, पुनर्वसु, मूळ, पुष्य, मृग हीं नक्षत्रें आणि, रवि, भौम, गुरु, हे वार पुंसवनादि कर्मांस उक्त होत.

कर्णवेध॥ ॥पौष्णवैष्णवकराश्विनिचित्रापुष्यवासवपुनर्वसुमैत्रे॥ संदवश्रवणवेधविधानंनिर्दिशंतिमुनयोहिशिशूनां १

**अर्थ-** रेवती, श्रवण, हस्त, अश्विनी, चित्रा, पुष्य, धनिष्ठा, पुनर्वसु, अनुराधा, मृग यांवर मुलाचा कर्णवेध करावा.

अन्नप्राशन॥ ॥रेवतीश्रुतिपुनर्वसुहस्तब्राह्म्य तःपृथगपीदुतयेच॥ त्र्युत्तरेषुगदितो हि नवान्नप्राशनंतुऋषिभिःपृथुकानां १

**अर्थ-** रेवती, श्रवण, पुनर्वसु, हस्त, रोहिणी, मृग, आर्द्रा, तीन्ही उत्तरा यांवर लहान मुलास प्रथम अन्नप्राशन करावें.

श्मश्रुकर्म॥ ॥पुष्यपौष्णाश्विनीष्वेंदवेचशाक्रे हस्तादित्रिके भेष्वदित्यां॥ क्षौरकार्यंवैष्णवाद्यत्रयेचमुक्त्वाभौमादित्यपानंगिवारान्॥१॥

**अर्थ-** श्मश्रु करण्यास पुष्य, रेवती, अश्विनी, मृग, ज्येष्ठा, हस्त, चित्रा स्वाती, पुनर्वसु, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हीं नक्षत्रें उक्त होत आणि, भौम, रवि, शनि हे वार वर्ज.

दंतबंधन ॥ ॥येषुयेषुप्रशंसंतिक्षुरकर्ममहर्षयः ॥ तेषुतेष्वेव शस्तानिनखदंतादिलेखनं ॥१॥

अर्थ- दंत बांधणें व नखें काढणें यांस जीं श्मश्रु कर्मास नक्षत्रें सांगितलीं आहेत तींच उक्त होत.

आज्ञयानृपतेर्द्विजन्मनांदारकर्मसृतसूतकेषुच ॥ बंध मोक्षमखदीक्षणेषुच क्षौरमिष्टमखिलेषुनुर्दिनं ॥१॥

अर्थ- राजाची अथवा ब्राह्मणाची आज्ञा व क्रिया करण्याचे आदीं, सूत कांचे अंत्यदिनीं, बंदींतून सुटल्यानंतर आणि यज्ञाचे ठायीं अवश्य श्मश्रु कर्म करावें तें पुष्टिप्रद होईल.

ताराशुद्धिक्षौरेरविगुरुशुद्धावनदीक्षा ॥ शुक्रविशुद्धिर्या- त्रायांसर्वेशुद्धिःशशांकत ॥१॥

अर्थ- श्मश्रूस ताराशुद्धि (नक्षत्रशु०) व्रतग्रहणीं रविगुरुशुद्धि, यात्रेस जाण्यास शुक्रशुद्धि आणि सर्व कार्यास चंद्रशुद्धि पहा०

श्मश्रुकर्मासवर्ज्य ॥ ॥भद्रापक्षांतरिक्ताव्रतदिनचक्रभूष्या हपष्ठीषुरात्रौसंध्यापातारभास्वच्छनिषुघटधनुःकर्कक न्यागतेऽर्के ॥जन्मर्क्षेजन्ममासेक्रतुदिनयजन भूषितोग्रामयात्री भुक्ताभ्यक्ताभिषिक्तःसमदिनरहितःश्मश्रुकार्यंनकुर्यात् ॥१॥

अर्थ- कल्याणी, पूर्णिमा, अमावास्या, चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, व्रतदिवस, अ- ष्टमी, प्रतिपदा, श्राद्धदिवस, षष्ठी, रात्रि संध्याकाळ, व्यतीपातादि दुष्टयोग, भौम वार, रविवार, शनिवार, कुंभ, धनु, कर्क, कन्या ह्या चार राशींस सूर्य असतां, जन्मनक्षत्र व जन्ममास, हवनादिक कर्म असेल ते दिवशीं, अलंकारादिक धा रण केलें असतां, प्रस्थान करणें ते दिवशीं, भोजन केल्यावर, अभ्यंगस्नान केलें असतां, मंगलाभिषेक जाहल्यावर, स्त्री रजस्वला असतां व समदिवशीं श्मश्रु करूं नये.

मौंजीबंधनासन० ॥ ॥सौम्यपौष्णवैष्णवासवादित्यहस्त स्वातीत्वाष्ट्रपुष्याश्विभेषु ॥ ऋक्षेदित्यांमेखलाबंधमोक्षौ- प्रस्मर्यतेतन्नूतमाचार्यवर्यैः ॥१॥

अर्थ- मृग, रेवती, श्रवण, धनिष्ठा, हस्त, स्वाती, चित्रा, पुष्य, अश्विनी, पुनर्व- सु ह्या नक्षत्रांवर मौंजी बंधन करावें अथवा मौंजी सोडावी प्रशस्त आहे.

## विवाहनक्षत्रें

मूलमैत्रमृगरोहिणीकरैः पौष्णमारुतमघोत्तरान्वितैः॥ानि
र्विधाभिरुडुभिर्मृगीदृशां पाणिपीडनविधिर्विधीयते ॥१॥

अर्थ- मूळ, अनुराधा, मृग, रोहिणी, हस्त, रेवती, स्वाती, मघा, तीन्ही उत्तराही वेध रहित नक्षत्रें विवाहास उक्त होत.

## अग्निहोत्र घेण्यास.

प्राजापत्येपूषभेसद्विदैवपुष्येज्येष्ठास्वैंदवेकृत्तिकास्तु ॥ अग्न्याधानंतूत्तराणात्रयेपिश्रेष्ठंप्रोक्तंप्राक्तनैर्विप्रमुख्यैः १.

अर्थ- रोहिणी, रेवती, विशाखा, पुष्य, ज्येष्ठा, मृग, कृत्तिका, आणि तीन्ही उत्तरा यांचे ठायीं प्रथम अग्निहोत्र घेण्यास आरंभ करावा.

## विद्याभ्यास करण्यास नक्षत्रें.

मृगादिपंचस्वपिभेषुमूले हस्तादिकेत्रयेऽश्विनीषु॥
पूर्वात्रयेचश्रवणत्रये तद्विद्यासमारंभसुशान्तिसिद्ध्यै ॥१॥

अर्थ- मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मूळ, हस्त, अश्विनी, पूर्वा षाढा, पूर्वाभाद्रपदा, चित्रा, स्वाती, श्रवण, ह्या नक्षत्रावर मुलास प्रथम विद्याभ्यासास आरंभ करावा सिद्धि होय.

## औषध घेण्यास नक्षत्रें.

पौष्णाद्वयेचादितिभेद्वयेच हस्तत्रयेचश्रवणत्रयेच ॥ मैत्रेच मूलेचमृगेचशस्तं भैषज्यकर्मप्रवदंतिसंतः ॥१॥ ॥ ॥ ॥

अर्थ- रेवती, अश्विनी, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, श्रवण, धनिष्ठा, शततारका, अनुराधा, मूळ, मृग याजवर औषध घ्यावें.

## रोग उत्पन्न होतो त्याचें शुभाशुभ पाहणें.

स्वात्याश्लेषारौद्रपूर्वात्रयेषु ज्येष्ठार्कभौमस्यर्यजे सूर्यवारे॥ नंदा
रिक्तास्वेचरोगस्यचास्ति मृत्युःज्ञेयः शंकरोरक्षितापि ॥१॥

अर्थ- स्वाती, आश्लेषा, आर्द्रा, तीन्ही पूर्वा, ज्येष्ठा आणि भौम, शनि, रवि हे वार; नंदातिथि (प्रतिपदा, षष्ठी, एकादशी) रिक्तातिथि (चतुर्थी, नवमी, चतुर्दशी) यावर रोग उत्पन्न झाला तर शंकराच्यानेंही रक्षण करवणार नाहीं.

## रोगमुक्ति होण्याचें प्रमाण

व्याध्युत्पत्तिर्यस्य पौष्णे समैत्रे प्राणत्राणं जायते तस्य कृच्छ्रात्॥ वैश्वे सौम्ये रोगमुक्तिस्तु मासाद्विंशत्यास्याद्वासराणां मघास्व॥१॥

अर्थः- रोग उत्पन्न होईल त्या दिवशीं जर रेवती अथवा अनुराधा असतील तर कष्टानें प्राण रक्षण होईल; उत्तराषाढा किंवा मृग असलेंतर एक मासपीडा भोगील आणि मघा असल्या तर वीस दिवस पीडा भोगील.

पक्षाद्धस्ते वासवे स्याद्विदैवे मूलाश्विन्योरग्निधिष्ण्ये नवाहात्॥ याम्ये त्वाष्ट्रे वैष्णवे वारुणे च नेरुज्यं स्यान्नूनमेकादशाहात्॥१

अर्थः- हस्तनक्षत्रीं रोगोत्पत्ति झाली असतां १५ दिवस पीडा भोगील; धनिष्ठा, विशाखा, मूळ, अश्विनी, कृत्तिका असल्यास ९ दिवस पीडा भोगील आणि भरणी, चित्रा, श्रवण, शततारका, असल्या तर ११ दिवस पीडा भोगील.

आहिर्बुध्न्ये तिष्यसंज्ञे सभाग्ये प्राजापत्यादित्ययोः सप्तरात्रात्॥ रोगान्मुक्तिर्जायते मानवानां निःसंदिग्धं जल्पितं गर्गमुख्यैः

अर्थः- उत्तराभाद्रपदा, पुष्य, पूर्वाफा० अभिजित्, पुनर्वसु या नक्षत्रीं रोग उत्पन्न जाहला असतां ७ दिवसांनी पीडा निःसंशयें करून जाईल असें गर्गऋषि सांगतात.

## रोगमुक्तिस्नानास नक्षत्रें.

इंदोर्वारे भार्गवे च ध्रुवेषु सार्पादित्यस्वातियुक्तेषु भेषु॥ पित्र्ये चान्त्ये चैव कुर्यात्कदाचिन्नैव स्नानं रोगमुक्तस्य जंतोः॥१॥

अर्थः- सोमवार, शुक्रवार आणि ध्रुव नक्षत्रें ( रोहिणी, तीन्ही उत्तरा, )-आश्लेषा, पुनर्वसु व स्वाती हीं रोगमुक्तिस्नानास शुभ होत आणि मघा, रेवती यांवर रोगमुक्त मनुष्यानीं स्नान करूं नये.

## रोगमुक्तिस्नानास लग्न पाहणें-

लग्ने चरे सूर्यकुजेज्यवारे रिक्तातिथौ चंद्रबले च हीने॥ केंद्रत्रिकोणाष्टगतेच पापे स्नानं हितं रोगविमुक्तिकानां॥१॥

अर्थः- चरलग्नें ( मेष, कर्क, तूळ, मकर ) आणि रवि, भौम, गुरु हे वार रिक्तातिथि ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ) हीं इतकीं असावीं आणि चंद्रबळ नसावें; लग्नादि केंद्रस्थानीं ( १।४।७।१० ), त्रिकोण स्थानीं ( ९।५ ) आणि-

द्वितीय स्थानीं पापग्रह असावे असें लग्न पाहून रोगमुक्ति स्नान केलें तर आरोग्य होईल.

### लता औषधी व वृक्ष लावण्यास नक्षत्रं.

सावित्रातिष्याश्विन वारुणानि मूलं विशाखान्च मृदुध्रुवाणि॥ लतौषधीपादपरोपणेषु शुभानि भानि प्रतिपादितानि ॥ १ ॥

अर्थः- हस्त, पुष्य, अश्विनी, शततारका, मूळ, विशाखा आणि मृदुसंज्ञक व ध्रुव संज्ञक हीं नक्षत्रें मागील कोष्टकांत लिहिलीं आहेत. तीं घ्यावीं आणि यांवर वेली औषधी व वृक्ष लावावे शुभ होत.

### कूपारंभास नक्षत्रें

हस्तस्त्रिस्त्रोवासवंवारुणंचशैवं पैत्र्यं त्रीणिचैवोत्तराणि ॥ प्राजापत्यंचापिनक्षत्रमाहुः कूपारंभेश्रेष्ठमाद्यामुनींद्राः ॥ १ ॥

अर्थः- हस्त, चित्रा, स्वाती, धनिष्ठा, शततारका, आर्द्रा, मघा, ३ उत्तरा आणि रोहिणी ह्या नक्षत्रांवर कूपारंभ करावा असें ऋषि सांगतात.

### द्रव्य देणें व ठेवणें

साधारणोग्रध्रुवदारुणाख्येधिष्ण्येयदत्तद्रविणंप्रयुक्तं ॥ हस्तेनचिन्त्यस्तवस्तु प्रनष्टंनलभ्यतेतन्नियतं कदाचित् ॥ १ ॥

अर्थः- साधारण, उग्र, ध्रुव, दारुण ह्या संज्ञेचीं नक्षत्रें मागील कोष्टकांत लिहिलीं आहेत त्यांजवर दुसऱ्यास दिलेलें अथवा ठेविलेलें द्रव्य लभ्य होणार नाहीं आणि हरवलेली वस्तु सांपडणार नाहीं.

### हत्ती देणें व आणणें.

हस्तेषुचित्रास्वतथाश्विनीषुस्वातौचपुष्येचपुनर्वसौच॥ प्रोक्तानिसर्वाण्यपिकुंजराणां कर्माणिगर्गप्रमुखैः शुभानि १

अर्थः- हस्त, चित्रा, अश्विनी, स्वाती, पुष्य आणि पुनर्वसु ह्या नक्षत्रांवर हत्ती देणें व घेणें; अलंकारानीं श्रृंगारणें हीं सकल कर्में करावीं.

### घोडा देणें व आणणें

पुष्यश्रविष्ठाश्विनिसौम्यभेषुपौष्णानिलादित्यकराब्जयेषु ॥ सवारुणर्क्षेषुबुधैःस्मृतानिसर्वाणिकार्याणितुरंगमाणां ॥ १

अर्थः- पुष्य, धनिष्ठा, अश्विनी, मृग, रेवती, स्वाती, पुनर्वसु, हस्त, शततारका. ह्या नक्षत्रांवर अश्व घेणें व देणें व अलंकारानीं शृंगारणें इत्या-

दिक सकल कार्यें करावीं.

गवादिपशु आणणें व पोंहोंचविणें यांस वर्ज्य नक्षत्रें.

चित्रोत्तरा श्रवण रोहिणीषु चतुर्दशी दर्शादिवाष्टमीषु गव्या प्रवेशगमनं प्रदध्यान्नी पान्यशूनां न कदाचिदेव ॥ १ ॥

अर्थ- चित्रा, तीन्ही उत्तरा, श्रवण, रोहिणी, चतुर्दशी, अमावास्येस दिवा, अष्टमी यांचे ठायीं पशूंस बाहेर गांवीं पाठवूं नये. व आणूं ही नये.

गायी घेणें व विकणें यांस व.

शक्रवासवक्ररेषु विशाखा पुष्यवारुणपुनर्वसुभेषु ॥ अश्विपूषभयुतेषु विधेयो विक्रयः क्रयविधिः सुरभीणां ॥ १

अर्थ- ज्येष्ठा, विशाखा, हस्त, धनिष्ठा, पुष्य शततारका, पुनर्वसु, अश्विनी, रेवती ह्या नक्षत्रांचे ठायीं गायींचा क्रय, विक्रय करूं नये.

दक्षिणदिग्गमनादिक व तृणादिकांचा संग्रह यांस वर्ज्य

वासवोत्तरदलादिपंचके याम्यदिग्गमनगेहगोपनं ॥ प्रेतदाहतृणकाष्ठसंग्रहः शय्यकावितननं च वर्जयेत् ॥ १ ॥

अर्थ- धनिष्ठांच्या उत्तरार्धापासून नक्षत्रें ५, यांचे ठायीं दक्षिण दिशेस जाणें, गृह नीट करणें, प्रेतदाह, तृण व काष्ठ यांचा संग्रह आणि बाजा, पलंग, आदि करून विणणें हीं सकल कार्यें वर्जावीं.

नांगर धरण्यास नक्षत्रें.

मृदुध्रुवक्षिप्रचरेषु मूलमघाविशाखासहितेषु भेषु ॥ हलप्रवाहं प्रथमं विदध्यान्नीरोगमुष्कान्वितसौरभेयैः ॥ १ ॥

अर्थ- मृदु, ध्रुव, क्षिप्र, चर ह्या संज्ञेचीं कोष्टकांतील नक्षत्रें व मूळ, मघा, विशाखा ह्या नक्षत्रांवर बैलांस मुष्की घालून प्रथम नांगर धरावा.

बीज पेरण्यास नक्षत्रें

हस्ताश्विपुष्योत्तररोहिणीषु चित्रानुराधामृगरेवतीषु ॥ स्वातीधनिष्ठासु मघासु मूले बीजाभिरुत्कृष्टफलप्रतिष्ठा १

अर्थ- हस्त, अश्विनी, पुष्य, तीन्ही उत्तरा, रोहिणी, चित्रा, अनुराधा, मृग, रेवती, स्वाती, धनिष्ठा, मघा, मूळ ह्या नक्षत्रांवर बीज पेरणें उक्त होय.

सर्पदंशास वर्ज्य.

यः कृत्तिकामूलमघाविशाखासार्पांतकार्द्रासु भुजंगदष्टः ॥

सर्वैनतेयेनसुरक्षितोपिप्राप्नोतिमृत्योर्वदनंमनुष्यः ॥ १ ॥

अर्थ- कृत्तिका, मूळ, मघा, विशाखा, आश्लेषा, रेवती, आर्द्रा ह्या नक्षत्रांवर सर्प दंश जाहला असतां गरुड संरक्षण करीत असला तथापि तो मनुष्य मृत्यु पावेल.

## नृत्यारंभकरण्यास नक्षत्रें.

हस्तास्तिष्योवासवंचानुराधाज्येष्ठापौष्णंचारुणंचोत्तराच ॥ पूर्वाचार्यैःकीर्तितश्चंद्रवर्तीनृत्यारंभेशोभनोभस्यवर्गः ॥ १ ॥-

अर्थ- हस्त, पुष्य, धनिष्ठा, अनुराधा, ज्येष्ठा, रेवती, शततारका, तीन उत्तरा व चंद्रानुकूल्य पाहून नृत्यारंभ करावा, असें ऋषींचें वाक्य आहे.

## राज्याभिषेकास नक्षत्रें.

मैत्रशाक्रकरपुष्यरोहिणीवैष्णवश्रुतिसृषूत्तरासुच ॥ रेवती मृगशिरोश्विनीभुचस्माभृतांप्रथमभिषेकइष्यते ॥ १ ॥

अर्थ- अनुराधा, ज्येष्ठा हस्त, पुष्य, रोहिणी, श्रवण तीन उत्तरा, रेवती, मृग, अश्विनी ह्या नक्षत्रांवर राजास प्रथम अभिषेक करावा.

## राजदर्शनास नक्षत्रें.

सौम्याश्विनितिष्यश्रवणाश्रविष्ठाहस्तध्रुवत्वाष्ट्रसपूषभानि ॥ मैत्रेणयुक्तानिनरेश्वराणांविलोकनेभानिशुभप्रदानि ॥ १ ॥

अर्थ- मृग, अश्विनी, पुष्य, श्रवण, धनिष्ठा, हस्त, ध्रुवसंज्ञक, चित्रा, रेवती, अनुराधा ह्या नक्षत्रांवर राजाचें दर्शन घ्यावें, शुभप्रद होय.

## द्वितीयेसचंद्रोदय होतो त्याची फलश्रुति.

रौद्राहियाम्यानिलवारुणेंद्राण्याहुर्जघन्यानितथाध्रुहंति ॥ ध्रुवाहिर्दैवादितिभानिनूनमन्समानिशेषाणिपुनर्मुनींद्रैः ॥ १ ॥

बृहत्सुधान्यंकुरुतेसमर्घंजघन्यधिष्ण्येऽभ्युदितामहार्घं ॥ समेषुधिष्ण्येषुसमोहिमांशुर्वदंतिसादिग्धमिदंमहांतः ॥ १ ॥

अर्थ- आर्द्रा, आश्लेषा, भरणी, स्वाती, शततारका, ज्येष्ठा, हीं नक्षत्रें जघन्य होत यांवर मासाचा आदिचंद्रोदय जाहला असतां धान्याची महर्घता होईल; ध्रुव. (३ उत्तरा, रोहिणी) व पुनर्वसु हीं नक्षत्रें बृहत होत ह्यां वर चंद्रोदय झाला तर धान्य सवंग होईल आणि शेष राहिलेलीं नक्षत्रें सम जाणावीं यांजवर चंद्रोदय झालातर धारण सम राहील.

## राशिपरत्वें चंद्रोदयाचें फळ.

मीनमेषोदितश्चंद्रः सततंदक्षिणोन्नतः ॥ शेषोन्नतश्चोन्नरा
यांसमनावृषकुंभयोः ॥१॥ विड्वरंतुसमेचंद्रे दुर्भिक्षंदक्षिणो
न्नते। सुभिक्षंक्षेममारोग्यमुत्तराश्रितचंद्रमाः ॥ २ ॥

अर्थ- मीन अथवा मेष या राशींवर शुक्लद्वितीयेचा चंद्रोदय जाहला असतां चंद्राची उन्नतता दक्षिणेस असते तेणें करून दुर्भिक्षता होईल; मिथुनादि मकर पर्यंत राशींचाठायीं चंद्रोदय जाहला असतां उत्तरेस चंद्राची उन्नतता असते तेणें करून सुभिक्ष, क्षेम आणि आरोग्यता अशीं फलें होतात आणि वृषभ व कुंभ यांजवर चंद्रोदय झाला असतां चंद्राचें समत्व असतें तेणें करून राजांची कलह विड्वरता होते.

## पुष्यनक्षत्राचे गुणदोष.

परकृष्टनिखिलंनिहंतिपुष्योनखलानिहंतिपरंतुपुष्यदोषं ॥
अचममृतकरेऽष्टमेपिपुष्योविहितमुपैतिसदैवकर्मसिद्धिं १

अर्थ- पुष्य दुसरे दोष आणि अष्टमस्थानीं चंद्र असला तथापि तज्जन्य दोष ही दूर करितात परंतु त्या नक्षत्राचे दोष आहेत ते दूर न होतां कार्यसिद्धि करितात.

सिंहोयथासर्वचतुष्पदानां तथैवपुष्योबलवानुडूनां। चंद्रेवि.
रुद्धेप्यथगोचरेपिसिद्ध्यंतिकार्याणिकृतानिपुष्ये ॥ १ ॥

अर्थ- जसा चतुष्पदांमध्यें सिंह बलवान् असतो तसेंच नक्षत्रांमध्यें पुष्यनक्षत्र बलिष्ठ होय. गोचरींचा चंद्र कनिष्ठ चवथा, आठवा आणि बारावा असला तथापि पुष्य कार्य सिद्धि करितात.

ग्रहेणविद्धोप्यशुभान्वितोपिविरुद्धतारोपिविलोमगोपि ॥
करोत्यवश्यंसकलार्थसिद्धिंविहायपाणिग्रहणंतुपुष्यः ॥१॥

अर्थ- पुष्य, ग्रहानें विद्ध अथवा अशुभ ग्रह युक्त, विरुद्धतारा गत किंवा विलोम तारागत असतांही याचे ठायीं पाणिग्रहणा वांचून केले त्या सर्व कार्यांची अर्थसिद्धि करितो.

## योगप्रकरण.

प्रतिदिवसाचायोगपाहण्याचीपद्धति ॥ ॥ वाक्पतेरर्कन
क्षत्रं श्रवणाच्चांद्रमेवच ॥ गणयेत्तद्युतिं कुर्याद्योगः स्याद्द्-

क्षशेषतः ॥१॥

**अर्थ-** पुष्या पासून चालते सूर्यनक्षत्रा पावेतों नक्षत्रें मोजावीं व श्रवणा पासून दिवस नक्षत्रा पावेतों मोजावीं आणि दोन्हीं संख्या एकत्र करून २७नीं भागून जें शेष राहील तो योग जाणावा.

योगांचीं नांवें ॥ ॥ विष्कंभः प्रीतिरायुष्मान सौभाग्यः शोभनस्तथा ॥ अतिगंडः सुकर्माच धृतिः शूलस्तथैवच ॥१॥ गंडोवृद्धिर्ध्रुवश्चैवव्याघातोहर्षणस्तथा ॥ वज्रंसिद्धिर्व्यतीपातो वरीयान्परिघः शिवः ॥२॥ सिद्धिःसाध्यःशुभः शुक्लोब्रह्मेंद्रो वैधृतिः क्रमात् ॥ सप्तविंशतियोगास्तु कुर्युर्नामसमं फलं ॥३॥

अर्थ-

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | विष्कंभ. | ८ | धृति | १५ | वज्र | २२ | साध्य. |
| २ | प्रीति | ९ | शूल | १६ | सिद्धि | २३ | शुभ. |
| ३ | आयुष्मान. | १० | गंड | १७ | व्यतीपात. | २४ | शुक्ल |
| ४ | सौभाग्य. | ११ | वृद्धि | १८ | वरीयान | २५ | ब्रह्मा |
| ५ | शोभन. | १२ | ध्रुव | १९ | परिघ | २६ | ऐंद्र |
| ६ | अतिगंड | १३ | व्याघात | २० | शिव. | २७ | वैधृति |
| ७ | सुकर्मा. | १४ | हर्षण. | २१ | सिद्धि | ० | इतियोगाः |

योगघटिकावर्ज्यं ॥ ॥ विरुद्धसंज्ञाइहयेचयोगास्तेषामनिष्टः खलुपाद आद्यः ॥ सवैधृतिस्तुव्यतिपातनामा सर्वोप्यनिष्टः परिघस्यचार्धं ॥ तिस्रस्तुयोगेप्रथमेचवज्रेव्याघातसंज्ञेनवपंचशूले ॥ गंडेतिगंडेचषडेननाड्यः शुभेषुकार्येषुविवर्जनीयाः २

**अर्थ-** त्या सत्तावीस योगांच्या नांवा प्रमाणें यांचीं फलें जाणावीं व त्यांमध्यें वाईट नांवांचे योग आहेत त्यांचे आद्यपाद टाकावे आणि व्यतीपात, वैधृति हे सकल वर्जावे; परिघाचें पूर्वार्द्ध. विष्कंभाच्या ३ घटिका, वज्र ३ घटी, - व्याघात ९ घटी, गंड ६ घटी, अतिगंड ६ घटी आणि शूल ५ घटी याप्रमाणें वर्ज करून शुभकार्यें करावीं.

करणपांहण्याचीरीति ॥ ॥ गततिथयोद्विनिघ्नाश्चशुक्लप्रतिपदादितः ॥ सप्तगण्याः सप्तहृच्छेषाः करणंस्याद्ववादिकं ॥१॥

अर्थ- शुक्लप्रतिपदेपासून ज्या तिथीचीं करणें पाहिजेत तिच्या पूर्वतिथीपर्यंत जी तिथिसंख्या होईल ती दुप्पट करावी आणि सातानीं भागावी. शेष उरेल तें त्या तिथीचें करण जाणावें. प्रत्येक तिथींत दोन करणें भोगतात.

## करणांचीं नावें

बवाह्वयं बालवकौलवाख्यं ततो भवेत्तैतिलनामधेयं ॥ गराभिधानं वणिजं च विष्टिरित्याहुरार्याः करणानि सप्त ॥ १ ॥ अंते कृष्णचतुर्दश्यां शकुनिर्दर्शभागयोः ॥ ज्ञेयं चतुष्पदं नागं किंस्तुघ्नं प्रतिपद्दले ॥ २ ॥ ॥ स्वामी ॥ ॥ इंद्रोब्जस्वामिमित्राभूमा ऽर्यमा भूः श्रीः कीनाशश्चेति तिथ्यर्धनाथाः ॥ कल्युक्षाख्यौसर्पवायू तथैव येचत्वारस्तेस्थिराणां चतुर्णां ॥ ३ ॥ ॥ कृत्यें पौष्टिकस्थिरशुभानि बवाख्ये बालवेद्विजहितान्यपि कुर्यात् ॥ कौलवे प्रमदमित्रविधानं तैतिले भुभगताश्रयकर्म ॥ ४ ॥ गरे च बीजाश्रयकर्षणानि वाणिज्यके स्थैर्यवणिक्क्रियाश्च ॥ न सिद्धिमायाति कृतं च विष्ट्यां विषारिघातादिषु तत्र सिद्धिः ॥ ५ ॥ मंत्रौषधानि शकुनौ तु सपौष्टिकानि गोविप्रराज्यपितृकर्म चतुष्पदे पि ॥ सौभाग्यदारुणधृतिध्रुवकर्म नागे किंस्तुघ्ननाम्नि निखिलं शुभकर्म कार्यं ॥ ६ ॥

अर्थ

| शुक्लतिथि ६० | | | | कृष्णातिथि ६० | | | | नांवें | स्वामी | कृत्यें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| पूर्वदळ | | उत्तरदळ | | पूर्वदळ | | उत्तरदळ | | | | |
| १ | स्थिर | | ० | ० | ० | ० | ० | किंस्तु० | वायु | शुभ कार्यें करावीं |
| ५ | १२ | १ | १५ | ४ | ११ | ७ | ० | बव. | इंद्र | सर्व उत्साह करावे तळें, देवळें बांधा० |
| २ | ९ | ५ | १२ | १ | ८ | ४ | ११ | बालव | ब्रह्मा | ब्राह्मणाचें हित करावें |
| ६ | १३ | २ | ९ | ५ | १२ | १ | ८ | कौलव. | मित्र. | उन्माद आणि मित्रत्व करावें |
| ३ | १० | ६ | १३ | २ | ९ | ५ | १२ | तैतिल. | सूर्य. | विवाहादि मंगलकार्यें करावीं |
| ७ | १४ | ३ | १० | ६ | १३ | ९ | २ | गरज | भूमि | बीज पेरणें, नांगर धरणें. |
| ४ | ११ | ७ | १४ | ३ | १० | ६ | १३ | वणिज | लक्ष्मी | देवभक्ति० गृह बांधणें- दुकान घाल० |
| ८ | १५ | ४ | ११ | ७ | १४ | ३ | १० | विष्टि | यम | सर्व कर्में वर्ज्य परंतु विष अग्निघात इत्यादि क्रूर कर्में करावीं. |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थिर. | ० | ० | ० | ० | ० | १४ | शकुनि | कलि | मंत्रोपदेश, औषध, ग्र॰पू॰ करावी. |
| स्थिर | ० | ० | ३० | ० | ० | ० | चतुष्पाद | बैल. | गाई, हत्ती, देणें, घेणें, राज्याभिषेक आणि पितृकार्यें करावीं |
| स्थिर. | ० | ० | ० | ० | ० | ३० | नाग. | सर्प | सौभाग्यकर्में, लढाईंत जाणें, धैर्य करणें, विद्याभ्यास करणें. |

कल्याणी

तिथिमान॥ ॥ कृष्णेअग्निदिशोरूर्ध्वंसप्तमीभूतयोरधः॥ शुक्लेवेदेशयोरूर्ध्वंभद्राप्राग्वसुपूर्णयोः॥१॥ मनुवसुमुनितिथिकगदशशिवगुणसंख्यासुतिथिषुपूर्वोत्या॥ आयातिविष्टिरेषाप्रष्टेशुभद्रापुरस्त्वशुभा॥२॥ शास्त्रार्थे दिवास्पेमुखीभद्राराज्ञौभद्रातुवृश्चिकी॥ सर्पस्यचमुखंत्याज्यंराज्ञौपुच्छंपरित्यजेत्॥३॥ रात्रिभद्रायदाह्निस्याद्दिवाभद्रायदानिशि॥ नतत्रभद्रादोषःस्यात्सर्वकार्याणिसाधयेत्॥४॥ शरीरभाग॥ ॥नाड्यस्तुपंचवदनेऽथगलेतथैकावक्षोदशेकसहितानियतंचतस्रः॥ नाभिःकटीषडथपुच्छलताच्चतिस्रोविष्टेर्बुधैरभिहितांगविभागएषः॥५॥ ॥भागफल॥ मुखेकार्यध्वस्तीभवतिमरणंचाथगलकेधनेहानिर्वक्षस्यथकटितटेबुद्धिविलयः॥ कलिर्नाभौदेशेविजयमथपुच्छेचजगदुःशरीरेभद्रायाःपृथगितिफलंपूर्वमुनयः॥६॥ चंद्रावरूनस्था॰ मीनेमेषालिकर्केशशिनिनिवसतिस्वर्गसंस्थापिविष्टिःकन्यायांतोलिसंस्थेधनुमिथुनगतेनागलोकेनिवासः॥कुंभसिंहेवृषेवामकरमुपगतेराजतेमृत्युलोकेभद्राचक्रप्रभावाद्धिमकरतनयानाशुभालौकिकेस्यात्॥७॥ ॥स्थानफल॥ स्वर्गेभद्राभवेत्सौख्यंपातालेचधनागमः॥ मृत्युलोकेयदाभद्राकार्यसिद्धिस्तदानहि॥८॥ ॥वारपरत्वेंनांवें॥ ॥ सोमशुक्रेचकल्याणीशनौचैववृश्चिकी॥गुरौपुण्यवतीज्ञेयाचान्यवारेषुभद्रका॥९॥

अर्थ-

| तिथि | शास्त्रार्थ | घ.सं. | स्थानें | फळें | चंद्र | स्थानें | फळें | वार | नांवें |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | ह्या तिथींची ३० घटिका उत्त- | ३ | पुच्छ | विजय | मीन | स्वर्गीं | सौख्य | सोम | |
| कृष्ण | रार्धाची भद्रा तिचें नांव वृ- | | | | मेष | | | शुक्र | कल्याणी. |
| १० | श्चिकी ही दिवसास आलीत | ६ | कटि | बुद्धिना. | वृश्चि | | | | |
| ४ | र तीन घटिका पुच्छ वर्जावें | | | | कर्क | पाताळीं | धनप्राप्ति | शनि | वृश्चिकी |
| शुक्ल | मुख शुभ होय. उत्तरार्ध म्ह | ४ | नाभि | कलह | कन्या | | | | |
| १५ | णजे रात्रि ह्या तिथीची ३० घ | | | | तूळ | | | गुरु | |
| ७ | टिका पूर्वार्धाची भद्रा नांव | ११ | हृदय | धनना. | धन | | | | पुण्यवती |
| कृष्ण | सर्पिणी ही रात्रीस आली तर | | | | मिथुन | मृत्युलोकीं | अशुभ | रवि | भद्रा |
| १४ | ५ घटिका विध्वंसक मुख | १ | गळा | मरण. | कुंभ. | | | बुध | |
| ८ | वर्जावें. पुढें पुच्छ शुभ हो- | | | | सिंह | | | | भद्रा |
| शुक्ल | य. पूर्वार्द्ध म्हणजे दिवस- | ५ | मुख | विध्वंस | वृष | | | भोम | |
| १५ | होय. | ३० | | | मकर | | | | भद्रा |

दैत्येंद्रैः समरेऽमरेषु विजितेष्वीशः क्रुधा दृष्टवान् स्वात्का याकिल निर्गता खरमुखी लांगूलिनी चक्रपात्॥ त्रिपादिः सप्तभुजा मृगेंद्रगलका क्षामोदरी प्रेतगा दैत्यघ्नी मुदितैः सुरैस्तु श्रवणप्रांते नियुक्तानुसा॥ १०॥

अर्थ- दैत्य आणि देव या उभयतांच्या युद्धांत देवांचा पराभव होतो असें शंकरानीं जाणून क्रोधातें पावून आपले शरीरापासून काढिली ती असी कीं, गर्दभमुखी, पुच्छवती, नांवविष्टि, सप्तभुजा, कंठ सिंहासारिखा उदर कृश, प्रेतावर बसलेली आणि दैत्यांस मारणारी अशी देवांनीं कर्णप्रांतीं ठेविली जी कल्याणी प्रसिद्ध आहे ती जाणावी.

संक्रांति॥ ॥वारपरत्वेंनांवें॥ ॥घोरारवौध्वांक्ष्यमृतद्युतौ-
च संक्रांतिरारेच महोदरीस्यात्॥ मंदाकिनी ज्ञेच गुरौच नंदामि
श्रा भृगौ राक्षसी चार्कपुत्रे॥ १॥ नक्षत्रपरत्वेंनांवें ॥उग्रक्षिप्र
चरैर्मैत्र ध्रुव मिश्राख्य दारुणैः॥ ऋक्षैः संक्रांतिरर्कस्य घोराद्या
क्रमशो भवेत्॥ २॥ फलें॥ ध्वांक्षी वैश्यान् सुखयति महोदर्य-
लं चौरसार्थान् घोरा शूद्रान् अथ नरपतीन् यच्च मंदाकिनी च॥ नंदाख्या.

चाद्विजवरगणान्मिश्रकाख्यापशूंश्चचांडालानांप्ररूतिमखिलां राक्षसीसंज्ञिताच ॥ ३ ॥ काळ व फळें ॥ पूर्वाह्णकालेनृपतिर्द्विजें द्रान्मध्यंदिनेचाथविशोपराण्हे ॥ शूद्रानूरवावस्तमितेप्रदोषेपि शाचकान्राभिचरान्निशीथे ॥ ४ ॥ नटादिकांश्चापररात्रिकाले मत्यूषकालेपशुपालकांश्च ॥ संक्रांतिरर्कस्यसमस्तलिंगान्यभा त्संध्यासमयेनिहंति ॥ ५ ॥ दिशासन्मुख ॥ अर्केज्यशुक्रेमुखंपूर्वे सौम्येभौमेचदक्षिणे ॥ शनौचंद्रेमुखंपश्चाद्गुरौचैवोत्तरामुखी ॥ ६ ॥

अर्थ- वार नक्षत्र परत्वें संक्रांति पाहण्याचें कोष्टक पुढें लिहिलें आहे.

| वार. | नक्षत्रें | नांवें | फळश्रुतिचांग. | काळ: | फळश्रुति वाईट. | दिशागमन |
|---|---|---|---|---|---|---|
| रवि | उग्र | घोरा. | शूद्रांस सुरव. | पूर्वाह्ण. | विप्रांस व राजांस वाईट | पूर्वेस. |
| सोम. | क्षिप्र. | ध्वांक्षी | वैश्यांससुरव. | मध्याह्न | वैश्यांस वाईट. | पश्चिमेस. |
| भौम | चर. | महोद | चोरांस साह्य | अपराण्ह | शूद्रांस वाईट. | दक्षिणेस. |
| बुध. | मैत्र | मंदाकि | राजांस साह्य. | प्रदोष. | पिशाचांस वाईट. | दक्षिणेस. |
| गुरु. | ध्रुव. | नंदा. | द्विजवरांस साह्य | मध्यरात्रि. | राक्षसांस वाईट. | उत्तरेस. |
| शुक्र | मिश्र. | मिश्रा | पशूंस चांगली | अपरात्रि | नटांस वाईट. | पूर्वेस. |
| शनि | दारुण | राक्षसी | चांडालांससुरव. | पहाटसूर्योदय. | गोवारियांसवाईट. | पश्चिमेस. |

करणपरत्वेंसंक्रांति ॥ स्थिति ॥ चतुष्पदेतैतिलनागयोश्चसुप्तो रविः संक्रमणंकरोति ॥ विद्याद्ववाख्येचगराह्वयेचसबालवा ख्येस्थितएवविष्टौ ॥ १ ॥ फळ ॥ किंस्तुघ्ननाम्निशकुनेवणिकौल वाख्येचोर्ध्वस्थितस्यखलुसंक्रमणंरवेः स्यात् ॥ धान्यार्घवृष्टि षुभवेत्क्रमशस्त्वनिष्टोमध्यस्ततोतिमुनयःप्रवदंतिपूर्वे ॥ २ ॥ वाहनें ॥ सिंहोव्याघ्रोवराहश्चगर्दभः कुंजरस्तथा ॥ महिषीघोटकः श्वा चछागोवृषभकुक्कुटौ ॥ ३ ॥ उपवाहनें ॥ गजोवाजिर्वृषोमेषः खरोष्ट्रौकेसरीक्रमात् ॥ शार्दूलमहिषीव्याघ्रवानराश्चववादि तः ॥ ४ ॥ फळ ॥ गजेलक्ष्मीर्वृषेस्थैर्यंघोटकेवाहनेतथा ॥ सिंहे व्याघ्रेभयंप्रोक्तंदुर्भिक्षंगर्दभेशुनि ॥ ५ ॥ वराहेवामनीपीडा जायतेमेषवाहने ॥ महिषेचभवेत्क्लेशः कुक्कुटेमृत्युरेवच ॥ ६ ॥ वस्त्रं ॥ श्वेतपीतहरितंचपांडुरंरक्तश्यामममासितंबहुवर्णं ॥ कं बलोविवसनंघनवर्णान्यंशुकानिचववादिषुक्रमात् ॥ ७ ॥

आयुधें ॥ भृशुंडीचगदाखड्गं दंडकोदंडतोमरान् ॥ कुंतपाशांकुशास्त्रंचबाणश्चैवायुधंबवात् ॥ ८ ॥ भोजनपात्रें ॥ सौवर्णं राजतंताम्रंकांस्यंलोहंचखर्परं ॥ पत्रंवस्त्रंकरोभूमिः काष्ठपात्रंबवादितः ॥ ९ ॥ भक्ष्यपदार्थ ॥ अन्नंचपायसंभक्ष्यंपक्वान्नंचपयोदधि ॥ चित्रान्नगुडमध्वाज्यंशर्करातुबवादितः ॥ १० ॥ गंध ॥ कस्तूरीकुंकुमंचैवचंदनंमृत्तिकातथा ॥ गोरोचनमलक्तश्चहरिद्राचतथांजनं ॥ सिंदूरमगरुश्चैवकर्पूरश्चबवादितः ॥ ११ जाति ॥ देवभूताहिविहगपशवोमृगएवच ॥ ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रमिश्रजातिर्बवादितः ॥ १२ ॥ पुष्पें ॥ पुन्नागजातीबकुलश्चकेतकीबिल्वस्तथार्कः कमलंचदूर्वा ॥ मल्लीतथापाटलिकाजपाचबवादिपुष्पाणिचयोजयेत्तु ॥ १३ ॥ भूषणें ॥ नूपुरंकंकणंमुक्ताविद्रुमंमुकुटंमणिं ॥ गुंजावराटकंनीलंगारुडरुक्मकंबवात् ॥ १४ ॥ कंचुकी ॥ विचित्रपर्णशुकभूर्जपत्रिकासितातथापाटलनीलवर्णा ॥ कृष्णाजिनंचर्मचवल्कपांडुराबवादितश्चैवतुकंचुकीस्यात् ॥ १५ ॥ वयः ॥ शिशुः कुमारीचगतालकायुवाप्रौढाप्रगल्भाथतनश्चवृद्धा ॥ वंध्यातिवंध्याचसुतार्थिनीचप्रव्राजिकाचैवफलंशुभंबवात् ॥ १६ ॥

अर्थ

| करणे | बव | बालव | कौलव | तैतिल | गर | वणिज | विष्टि | शकुनी | चतुष्पाद | नाग | किंस्तु. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थिति | बसली | बसली | उभी | निजली | बसली | उभी | बसली | उभी | निजली | निजली | उभी |
| फळें | मध्यम | मध्यम | महर्घ | सवंग | मध्यम | महर्घ | मध्यम | महर्घ | स्वंग | सवंग | महर्घ |
| वाहनें | सिंह | व्याघ्र | डुकर | गाढव. | हत्ती | महिषी | घोडा | कुत्रा | मेंढा | बैल | कोंबडा |
| उपवाह. | गज | अश्व | बैल | मेंढा. | गाढव. | उंट. | सिंह | शार्दूल | म्हैस | व्याघ्र | वानर |
| फळे. | प्रीति | प्रीति | पीडा | स्वभिक्ष | लक्ष्मी | क्लेश. | स्वल्पभि. | स्थैर्य | पीडा | स्थैर्य | अपमृ. |
| वस्त्रें | पांढरे | पिंवळें | हिरवें | पांडुरकें | तांबडें | निळें | काळें | चित्रव. | चवाळें | पोपटी | घनवर्ण |
| आयुधें | भृशुंडी | गदा | खड्ग. | दंड | धनु | तोमर | कुंत | पाश | अंकुश | अस्त्र | तीर. |
| पात्र. | सोन्याचें | रुप्याचें | तांब्या. | कांशा. | लोह | खर्पर | पत्र | वस्त्र. | कर. | भूमि. | काष्ठ. |
| भक्षण | अन्न. | पायस. | भक्ष्य. | पक्वान्न | पय | दधि | चित्रा. | गूळ. | मध | तूप | साखर. |
| लेपन | कस्तूरी | कुंकुम | चंदन | माती | गोरोच. | अळता | हळद | काजळ | शेंदूर | अगरु | कापुर. |
| जाति | देव. | भूत | सर्प | पक्षी | पशु | मृग. | विप्र. | क्षत्रिय | वैश्य. | शूद्र | मिश्र. |
| पुष्प. | पुन्नाग | जाई | बकुल | केतक | बेल | रुई | कमल | दूर्वा | मोगरा. | पाटल. | जास्वंद |
| भूषण | तोरड्या | कंकण | मोतीं | पोवळें | मुगुट | मणि | गुंजा. | कवडी | नीळ | पाच | सुवर्ण |
| कंचुकी | चित्रवि. | पर्ण | हिरवी | भूर्जप | शुभ्र | श्वेतर. | निळी | कृष्णा. | चर्म | वल्कल | पांडुर |
| वय. | बाला | कुमारी | गताल. | युवा. | प्रौढा | प्रगल्भा | वृद्धा | वंध्या | अतिवं. | पुत्रव. | संन्या. |

## फलश्रुति.

वाहनादिबुधैर्ज्ञेयमथोक्रांतिविशेषतः ॥ वाहनादिकव-
स्तूनांसंक्रमात्तुविनाशता ॥ १ ॥

**अर्थ-** ज्या वाहनावर बसेल आणि ज्या ज्या वस्त्र धारण करील त्यांचा नाश होईल. असें जाणावें

मुहूर्त ॥ संक्रांतिकितीमुहूर्तकोणत्यानक्षत्रीं होतेतीं न-
क्षत्रें निरनिराळीं फलांसह सांगतो.

संक्रांतौमूर्तिभेदाहरपवनयमेवारुणेसार्पऐंद्रेएषापंचेंदुसं
ज्ञागुरुकरपितृभेचाग्निदस्रेचसौम्ये ॥ त्वाष्ट्रेमैत्रेचमूलेश्रु
तिवसुवपुषात्र्याणिपूर्वास्वरामब्राह्मादित्यर्यहिर्बुध्न्यभवतिशर
रुताश्चोत्तराश्चाणिऋक्षे ॥ १ ॥ बाणवेदैःसमर्घस्यान्मध्य-
स्थंव्योमरामयोः ॥ मूर्तिःपंचदशेयातिदुर्भिक्षंचप्रजायते ॥ २

**अर्थ-** १५ मुहूर्तें ह्मणजे आर्द्रा, स्वाती, भरणी, शततारका, आश्लेषा, ज्येष्ठा ह्या नक्षत्रांवर संक्रांति जाहली असतां प्रजेस दुर्भिक्षता जाणावी. ३० मुहूर्तें ह्मणजे पुष्य, हस्त, मघा, कृत्तिका, आश्विनी, मृग, चित्रा, अनुराधा, मूळ, श्रवण, धनिष्ठा, रेवती आणि ३ पूर्वा ह्या नक्षत्रांवर झाली असतां धारण मध्यम राहील आणि ४५ मुहूर्तें ह्म॰ रोहीणी, पुनर्वसु, विशाखा आणि तीन उत्तरा ह्या नक्षत्रीं जाहली असतां स्वस्थता जाणावी.

दुसरा प्रकार ॥ पूर्वसंक्रांतिनक्षत्रात्परसंक्रांतिऋक्षकं ॥
द्वित्रिसंख्यासमर्घस्याच्चतुःपंचमहर्घता ॥ १ ॥

**अर्थ-** गतमासस्थ संक्रांति दिननक्षत्र आणि प्राप्त संक्रांति दिननक्षत्र यांचें अंतर २ अथवा ३ असें आलें तर स्वस्थता होईल. आणि ४ अथवा ५ नक्षत्रांचें अंतर आलें तर महर्घता होईल.

धान्यघेणें ॥ ॥ संक्रांतिनाड्यस्तिथिवारऋक्षधान्याक्ष
रवह्निभिरात्तभागं ॥ संक्रांतिनाड्यानवभिर्भिताश्चसप्ताह-
ताःपावकभाजिताश्च ॥ एकेसमर्घेद्वितयेचसाम्यंशून्येमहा
र्घंमुनयोवदंति ॥ १ ॥

**अर्थ-** संक्रांतीच्या घटिका आणि गततिथि, वार, नक्षत्रें व धान्याचीं अक्षरें मोजून सर्व एकत्र करून तिहींनीं भागावीं असें एक मत आहे व दु

सऱ्या मतानें संक्रांतिनाडी मोजून त्यांत नऊ मिळवाचे आणि ७ नीं गुणू-
न ३ नीं भागाव्या शेष उरेल त्यानें फळ १ शेष राहिला तर धान्याची स्वस्थ
ता असेल. २ शेष राहिले तर मध्यम असेल. पूर्ण शेष राहिल्यास महर्घ
ता होईल. असें जाणावें

नक्षत्रपरत्वें संक्रांतीचें शुभाशुभफल॥ ॥संक्रांत्यधर
नक्षत्राद्गणयेज्जन्मभावधि॥ त्रिकंषट्कंत्रिकंषट्कंत्रिकंषट्कंपुनःपु
नः पंथाभोगोव्यथावस्त्रहानिश्चविपुलंधनं॥१॥ ॥ ५॥

**अर्थ-** संक्रांतीचे अधर नक्षत्रापासून जन्म नक्षत्रा पावेतों मोजावयाची री-
ति. प्रथम ३ नक्षत्रें पंथा. पुढे ६ नक्षत्रें भोग; ३ व्यथा; ६ वस्त्र, ३ हानिः,
६ बहुधनप्राप्ति या रीतीनें समजावें

जन्मर्क्षादिकांचें फल॥ ॥यस्यजन्मभमासाद्यातिथिसंक्र
मणंभवेत्॥ तन्मासाभ्यंतरेतस्यवैरंक्लेशोधनक्षयः॥१॥

**अर्थ-** ज्याचे जन्मनक्षत्रीं संक्रांत झाली असेल त्यानें कोणाशीं तरी वैर प
डेल; जन्म मासांत झाली तर क्लेश होतील आणि जन्मतिथीवर झाली अस-
ता धनाचा क्षय जाणावा.

संक्रांतीचें स्वरूप॥ ॥षष्टियोजनविस्तीर्णासंक्रांतिः पुरु-
षाकृतिः॥ एकवक्त्रानवभुजालंबोष्ठीदीर्घनासिका॥१॥पृ
ष्ठालोकाभ्रमंत्येवगृहीत्वाखर्परंकरे॥ एवंसंक्रमणंयस्यफ
लंप्रोक्तंमनीषिभिः॥२॥

**अर्थ-** शरीर ६० योजनें लांब आणि रुंद, पुरुषाकृति, एकमुखी, नवभुजा,
ओठ लांब, नासिका लांब, मागें पाहते आणि हातांत खापर घेऊन भ्रमण क
रिते असें जाणावें

हातांतफळ॥ ॥मेषालिकर्केचतथैवरक्तंचापेचमीनेचतुले
चपीतं॥ श्वेतंवृषेस्त्रीमिथुनेचचंद्रे कृष्णंचनक्रेचघटेचसिंहे
॥१॥ रक्तफलेभवेद्दुःखंश्वेतंचैवस्करंशुभं॥ पीतेश्रीस्तुत
थाप्रोक्ताश्यामेमृत्युर्नसंशयः॥२॥

**अर्थ-** मेष, वृश्चिक, कर्क याराशींस चंद्र असता संक्रांतीचा प्रवेश झाला तर-
तिचे हातांत आरक्त वर्णाचें फल आहे तेणें करून प्रजेस दुःख प्राप्ति हो-
ईल; धन, मीन, तूल याराशींस पिंवळे वर्णाचें, लक्ष्मी प्राप्ति; वृषभ, कन्या,

मिथुन या राशींस शुभवर्णाचें. स्त्रव, शुभप्राप्ति; मकर, कुंभ आणि सिंह-याराशींस चंद्र असतां सुष्ठावर्णाचें फळ, तें मृत्युकारक होय याप्रकारें राशि परत्वें फलें जाणावीं.

राशिपरत्वेंचंद्र॥ ॥यादृशेनहिमरश्मिमालिनासंक्रमोभव तितिग्मरोचिषः ॥ तादृशंफलमवाप्नुयान्नरःसाध्वसाध्वपि वशेनशीतगोः १

अर्थ- जसा चंद्र इष्टस्थानीं अथवा अनिष्टस्थानीं असतां फळ देतो तसेंच-चंद्र परत्वें संक्रांतीचें शुभाशुभ फल प्राप्त होतें.

पुण्यकाळ॥ पूर्वतोन्हिरविसंक्रमोयदिपुण्यकालघटिका-स्तुषोडश॥ अर्धरात्रिसमयादनंतरसंक्रमेपरदिनेहिपुण्यकं १

अर्थ- संक्रांति दिवसास झाली तर १६ घटी पूर्वी पुण्यकाळ आणि मध्य रात्री नंतर झाली तर दुसरे दिवशीं पुण्यकाळ जाणावा.

ग्रहणप्रकरण॥ ॥चंद्रग्रहणप्रवृत्ति॥भानोःपंचदशेऋक्षेचं द्रमायदितिष्ठति॥ पौर्णमास्यांनिशाशेषेचंद्रग्रहणमादिशेत १

अर्थ- सूर्यनक्षत्रापासून १५ वें चंद्रनक्षत्र आणि पूर्णिमा संपून रात्रि शेष राहिली तर त्या रात्रीस चंद्रग्रहण येईल असें जाणावें.

सूर्यग्रहण॥ ॥माघोनग्रस्तनक्षत्रात षोडशंयदि सूर्य-भे॥ अमावास्यादिवाशेषे सूर्यग्रहणमादिशेत ॥ १ ॥.

अर्थ- सर्व महिन्याचे अमावास्येस सूर्य आणि चंद्र एकराशीस येतात प-रंतु ग्रहणकालीं एके नक्षत्रीं दिवसास येऊन अमावास्या सरून दिवस शे-ष राहिला असतां सूर्यग्रहणसंधि होतो. त्या दिवशीं चंद्रनक्षत्रापासून सू-र्य नक्षत्रा पावेतों मोजून त्यांतून ११ काढून शेष १६ वें नक्षत्र आलें म्हणजे-सूर्य ग्रहण होतें.

राशिपरत्वेंशुभाशुभफळें॥ ॥त्रिषट्दशायोपगतंनरा-णांशुभमदंस्याद्ग्रहणंरवींद्वोः॥ द्विसप्तनंदेषुचमध्यमंस्या च्छेषेष्वनिष्टंमुनयोवदंति॥ १ ॥

अर्थ- सूर्य ग्रहण अथवा चंद्रग्रहण आपले राशीपासून ज्या राशीस होईल त्या राशिं ३, ६, १०, ११ त्या शुभ होत. २, ७, ९ त्या मध्यम आणि १, ४, ८, ५, १२ त्या राशि दुष्ट होत.

दुसरापक्ष॥ ॥ग्रासात्तृतीयोष्टमगश्चतुर्थस्तथायसंस्थः शुभदःस्वराशिः॥ग्रासाद्द्विःपंचनवर्तुमध्यस्ततोऽधमोक्ताश्चबुधैश्चशेषाः॥२॥

अर्थ- ज्या राशीस सूर्यग्रहण होईल त्या राशीपासून आपल्या राशी पावेतों मोजावें. ३, ८, ४, ११ या राशींतून आपली जन्मराशि असल्यास उत्तम होय ५, ९, ६ यांतून आल्यास मध्यम आणि १, २, ७, १०, १२ यांतून आल्यास कनिष्ठ या प्रमाणें फळें जाणावीं.

## संस्कार.

ऋतुप्रकरणशुभाशुभफळें॥ ॥तिथिरेकगुणंप्रोक्तंनक्षत्रंचचतुर्गुणं॥वारश्चषड्गुणोज्ञेयोमासश्चाष्टगुणःस्मृतः वस्त्रंशतगुणंविद्याद्दर्शनंचततोधिकं॥१॥

अर्थ- तिथीचा गुण १, नक्षत्राचे गुण ४, वाराचे गुण ६, मासाचे ८, वस्त्राचे १०० आणि जी दिठाळ पाहते तिचेगुण सर्वांहून अधिक परंतु चांगला दिवस असला तर चांगले गुण आणि दुष्ट दिवस असला तर वाईट गुण जाणावे.

मासफळ॥ ॥ आर्तवेप्रथमेचैत्रेवैधव्यंजायतेध्रुवं॥वैशाखे धनवृद्धिःस्याज्ज्येष्ठेरोगान्विताभवेत्॥२॥ आषाढेमृतवत्सा चश्रावणेधनसंयुता॥भाद्रेतुदुर्भगानारीआश्विनेधनधान्यभाक्॥३॥कार्तिकेधननाशाचमार्गशीर्षेबहुप्रजा॥पौषेचपुंश्चलीनारीमाघेपुत्रवतीभवेत्॥फाल्गुनेपुत्रसंपन्नाज्ञेयंमासफलंबुधैः॥४॥

अर्थ- चैत्रमासीं प्रथम ऋतु प्राप्त झाला असतां वैधव्य, वैशाखमासीं धनवृद्धि, ज्येष्ठमासीं रोगप्राप्ति, आषाढमासीं मृतप्रजा, श्रावण मासीं लक्ष्मीदायक, भाद्रपदमासीं दरिद्री, आश्विनमासीं धनधान्य युक्त, कार्तिक मासीं धननाश, मार्ग शीर्ष मासीं बहु प्रजा, पौषमासीं जारिणी, माघमासीं पुत्रवती व फाल्गुन मासीं पुत्रसंपन्न याप्रमाणें जाणावें.

तिथिफळें॥ शुचिर्नारीप्रतिपदिद्वितीयायांतुदुःखिनी॥तृतीयायांपुत्रवतीचतुर्थ्यांविधवाभवेत्॥५॥पंचम्यांचैवसौभाग्यंषष्ठ्यांकार्यविनाशिनी॥सप्तम्यांशुभ्रजानारीचाष्टम्यांराक्षसी

तथा ॥ ६ ॥ नवम्यांविधवानारीदशम्यांसौख्यभोगिनी ॥ एका
दश्यांशुभाचैर्नारीद्वादश्यांमरणंध्रुवं ॥ ७ ॥ त्रयोदश्यांशुभाप्रो-
क्ताचतुर्दश्यांपराग्विना ॥ पौर्णमास्याममायांचशुभंचाशुभमेवच ८

अर्थ- प्रतिपदेस ऋतु प्राप्त झाला असतां शुचि, द्वितीयेस दुःख भोगणारी, तृतीयेस पुत्रवती, चतुर्थीस विधवा, पंचमीस सौभाग्यवती, षष्ठीस कार्य नाशिनी, सप्तमीस कुप्रजाप्रसूति, अष्टमीस राक्षसी, नवमीस विधवा, दशमीस सौख्यभोगिनी, एकादशीस शुची, द्वादशीस मरण, त्रयोदशीस शुभ, चतुर्दशीस जारिणी, पूर्णिमेस शुभ व अमावास्येस अशुभ असें जाणावें.

ग्रहण व संक्रांति यांचें फळ॥ ॥ संक्रांत्यांग्रहणेचैव
वैरिणीचगतालका ९

अर्थ- संक्रांतीवर ऋतुप्राप्त झाला असतां वैरिणी आणि ग्रहणावर झाला असतां विधवा असें जाणावें.

वारफळ॥ ॥ आदित्येविधवानारीसोमेचैवमृतप्रजा ॥ मंग
लेआत्मघातीस्याद्बुधेकन्याप्रसूःस्मृता ॥ १० ॥ गुरुवारेसुतप्रा
प्तिःकन्यापुत्रयुताभृगौ ॥ मंदेचपुंश्चलीनारीज्ञेयंवारफलंशुभं ११

अर्थ- रविवारीं ऋतुप्राप्त जाहला असतां विधवा, सोमवारीं मृतप्रजा, भौमवारीं आत्मघातिनी, बुधवारीं वरकन्या प्रसूति होईल, गुरुवारीं पुत्र प्रसूति, भृगुवारीं कन्यापुत्र प्रसूति आणि शनिवारीं जारिणी होईल असें जाणावें.

नक्षत्रफळ.

अश्विन्यांसुभगानारीभरण्यांविधवाभवेत ॥ कृत्तिका-
यांचवंध्यास्याद्रोहिण्यांचारुभाषिणी ॥ १२ ॥ मृगेदारि-
द्र्ययुक्तोक्ताचार्द्रायांक्रोधकारिणी ॥ पुनर्वसौपुत्रवतीपुष्ये
पुत्रधनेश्वरी ॥ १३ ॥ आश्लेषायांभवेद्व्यामघायांचार्थसंयु
ता ॥ पूर्वायांचार्थयुक्ताचाथोत्तरायांसतीतथा ॥ १४ हस्तेपु
त्रधनैर्युक्ताचित्रायामनुचारिणी ॥ स्वात्यांन्यगर्भांचयवाविशा
खायांतुनिष्ठुरा ॥ १५ ॥ मैत्रेचदुर्भगानारीज्येष्ठायांविधवाभव
त ॥ मूलेपतिव्रतासाध्वीपूर्षासौभाग्यभागिनी ॥ १६ ॥ उषाचा
र्थवतीप्रोक्ताश्रवेसौभाग्यसंपदः ॥ धनिष्ठायांशुभानारीश
तभद्रान्विताबुधैः ॥ १७ ॥ पूभाचोक्ताकामिनीनांउभालक्ष्मीयुता-

शुभा ॥ रेवत्यांपतिरिक्तातुज्ञेयंभानांफलंबुधैः ॥ १८ ॥

**अर्थ-** अश्विनी नक्षत्रावर प्रथम ऋतु प्राप्त जाहला असतां शुभ, भरणीवर विधवा, कृत्तिकांवर वंध्या, रोहिणीवर प्रियभाषिणी, मृगांवर दरिद्री, आर्द्रावर क्रोधी, पुनर्वसूवर पुत्रवती, पुष्यावर पुत्रधनवती, आश्लेषांवर वांझ, मघांवर अर्थप्राप्ति, पूर्वांवर अर्थप्राप्ति, उत्तरांवर सती, हस्तावर पुत्रधनप्राप्ति, चित्रांवर पतिमतानुरूप वागणारी, स्वातींवर अन्यगर्भा, विशाखांवर निष्ठुर, अनुराधांवर दुर्भगा, ज्येष्ठांवर विधवा, मूळावर पतिव्रता, पूर्वाषाढांवर सौभाग्यवती, उत्तराषाढांवर लक्ष्मीदायक, श्रवणावर सौभाग्यसंपत्ति, धनिष्ठांवर शुभ, शततारकांवर कल्याणयुक्ता, पूर्वाभाद्रपदांवर उत्तम भोग, उत्तराभाद्रपदांवर लक्ष्मीप्राप्ति आणि रेवतींवर पती वांचून राहील असें जाणावें.

योगफळ ॥ ॥ आद्युतौविधवानारीविष्कंभेचरजस्वला ॥ स्नेहः प्रीतौतुदंपत्योरायुष्मतिधनप्रदा ॥ १९ ॥ सौभाग्ये पुत्रयुक्तातुशोभनेमंगलान्विता ॥ अतिगंडेतुविधवासुकर्मणिसुशोभना ॥ २० ॥ धृतौसंपत्तियुक्ताचशूलेरोगयुता भवेत् ॥ गंडेदुःखान्वितानारीवृद्धौपुत्रान्विताभवेत् ॥ २१ ॥ ध्रुवेतुशोभनानारीव्याघातेगर्भघातिनी ॥ हर्षणेहर्षयुक्तातुवज्रेचैवानपत्यता ॥ २२ ॥ सिद्धौपुत्रान्वितानारीव्यतीपातेविभर्तृका ॥ मृतवत्सावरीयसिपरिघेचाल्पजीविनी ॥ २३ ॥ शिवेपुत्रवतीनारीसिद्धौशीघ्रफलान्विता ॥ साध्ये धर्मपरानारीशुभेशुभगुणान्विता ॥ २४ ॥ शुक्लेशुभकरानारीब्रह्मणिस्वपतौरता ॥ ऐंद्रेदेवरतामोक्तावैधव्यंवैधृतौस्मृतं २५

**अर्थ-** विष्कंभ योगावर ऋतु प्राप्त जाहला असतां विधवा, प्रीतियोगावर उभयतांचा स्नेह, आयुष्मान योगावर धनप्राप्ति, सौभाग्यावर पुत्रप्राप्ति, शोभनावर मंगल, अतिगंडावर विधवा, सुकर्म्यावर शुभ, धृतीवर संपत्ति, शूलावर रोगिणी, गंडावर दुःखान्विता, वृद्धीवर पुत्रवती, ध्रुवावर शुभ व्याघातावर पति घातका, हर्षणावर हर्षयुक्ता, वज्रावर वंध्या, सिद्धीवर पुत्रान्विता, व्यतीपातावर पती वांचून राहील, वरीयान् योगावर मृतप्रजा, परिघावर अल्पजीवितवती, शिवयोगावर पुत्रान्विता, सिद्धियोगावर शीघ्र फलप्राप्ति, साध्यावर धर्मवती, शुभावर गुणयुक्त, शुक्लावर शुभकर्मवती, ब्र-

हस्त्यावर स्वपतिरता, ऐंद्रावर देवांच्या ठिकाणीं रत असेल आणि वैधृतीवर विधवा असें जाणावें.

करणफळ॥ ॥ ववेप्रोक्तातुवंध्यास्त्रीबालवेपुत्रसंपदा॥कौलवेपुंश्चलीनारीतैतिलेचारुभाषिणी॥२६॥गरेचगुणसंपन्नावाणिजेपुत्रिणीस्मृता॥विष्ट्यांचमृतवत्साचशकुनौकामपीडिता॥२७॥चतुष्पदेशुभानारीनागेपुत्रवतीभवेत्॥किंस्तुघ्नेव्यभिचारीतुकरणानांशुभंफलं॥२८॥

अर्थ- बव करणावर ऋतु प्राप्त झाहला असतां वंध्या, बालवावर पुत्रप्राप्ति, कौलवावर वेश्या, तैतिलावर प्रियभाषिणी, गरावर गुणसंपन्ना, वणिजावर पुत्रिणी, विष्टीवर मृतवत्सा, शकुनीवर कामातुर, चतुष्पादावर शुभा, नागावर पुत्रवती, किंस्तुघ्नावर जारिणी याप्रकारें करण फळें जाणावीं.

राशिफळ जारिणीचैवमेषेस्याद्वृषभेसुखभोगिनी॥मिथुनेधनयुक्ताचकर्कटेदुःखिताबुधैः॥२९॥सिंहेपुत्रवतीनारीकन्यायांमानिनीशुभा॥तुलेविचक्षणानारीवृश्चिकेव्यभिचारिणी॥३०॥धनेपतिव्रताज्ञेयामासहीनाचनक्रके॥कुंभेधनवतीज्ञेयामीनेचचपलाबुधैः॥३१॥

अर्थ- मेषराशीवर ऋतुप्राप्त जाहला असतां जारिणी, वृषभावर सुखभोगिनी, मिथुनावर धनयुक्ता, कर्कावर दुःखिनी, सिंहावर पुत्रवती, कन्येवर अभिमानिनी, तूळावर विचक्षणा, वृश्चिकावर जारिणी, धनावर पतिव्रता, मकरावर कृश, कुंभावर धनवती, मीनावर चपला असें जाणावें.

होराफळ सूर्येचव्याधिसंयुक्ताचांद्रहोरेपतिव्रता॥कुजहोरेतुदौर्भाग्यंबुधहोरेतुपुत्रिणी॥३२॥जीवेसर्वसमृद्धिःस्याद्भृगौसौभाग्यमेवच॥शनौसर्वधनाशःस्याद्धोरकस्यफलंबुधैः ३३

अर्थ- स्त्रीस प्रथम ऋतु प्राप्त होतो त्याकाळीं सूर्याचा होरा असतां व्याधि, चंद्राचा होरा असला तर पतिव्रता, भौमाचा होरा दुर्भगा, बुधाचा होरा पुत्रिका, गुरूचा होरा सर्वसमृद्धि, शुक्राचा होरा सौभाग्य आणि शनीचा होरा असतां सर्वविनाशिनी

लग्नफळ मेषलग्नेदरिद्राचवृषभेधनसंयुता॥कामिनीमिथुनेलग्नेकर्कटेपतिनाशिका॥सिंहेपुत्रप्रसूनिश्चपतियुक्ता

स्थिलग्नके॥ तूलेचैवांधतादासीवृश्चिकेदद्रुदुःखिनी॥३५
धनलग्नेधनैश्वर्यंमकरेकर्कशाभवेत्॥कुंभेवंशहयंचैव
मीनेसर्वगुणान्विता ३६

**अर्थ-** जी चालती संक्रांत असेल तेच प्रथम लग्न सूर्योदयीं जाणावें मेष लग्नीं ऋतु प्राप्त जाहला असतां दरिद्रता, वृषभलग्नीं धनयुक्ता, मिथुनीं कामिनी, कर्कीं पतिनाशका, सिंहीं पुत्रप्रसूति, कन्या लग्नीं पतियुक्ता, तूळीं अंधता दासी, वृश्चिकीं दद्रुदुःखिनी, धनीं धनैश्वर्यवती, मकरीं कर्कशा, कुंभीं वंशहृय नाशिनी, मीनलग्नीं गुणायुक्ता याप्रमाणें लग्नफळें जाणावीं.

ग्रहांचें फळ

लग्नेराहुश्चसौरिश्चरविचंद्रौतथैवच॥तदासाविधवा-
नारीसर्वसौभाग्यवर्जिता॥३७॥

**अर्थ-** ज्यालग्नीं स्त्रियांस प्रथम ऋतु प्राप्त होतो त्या लग्नीं राहु, शनि, रवि किंवा चंद्र ह्या चार ग्रहांतून एक ग्रह जरी असला तथापि त्या स्त्री स वैधव्य प्राप्त होईल.

रक्तफळ शोणितंबिंदुमात्रेणस्वैरिणीचाल्पशोणिता॥
रक्तरक्तेभवेत्पुत्रःकृष्णेचैवमृतप्रजा॥३८॥पिच्छलीचभ
वेद्वंध्याकाकवंध्याचपांडुरे॥पीतेदुश्चारिणीज्ञेयासुभगा
गुंजसादृशे॥३९॥सिंदूरवर्णेरक्तेतुकन्यासंततिरेवच॥४०

**अर्थ-** प्रथम ऋतु प्राप्त होतो त्या समयीं त्या ऋतुचें बिंदुमात्र अल्पत्व असलें तर त्याचें फळ स्वैरिणी, वर्ण तांबडा असल्यास पुत्रवती, काळा असल्यास मृतप्रजा, पिच्छळीस वांझ, पांढरा असल्यास काकवंध्या, पिंवळयास दुराचारिणी, गुंजेसारिखा असल्यास सुभगा, सिंदूर वर्ण असल्यास कन्या संतति या प्रकारें करून फळश्रुति जाणावी.

काळफळ पूर्वाह्णेसुभगाप्रोक्तामध्यान्हेचैवनिर्धना॥
पराण्हेत्वशुभाचैवसायान्हेसर्वभोगिनी॥४१॥ संध्य-
योरुभयोर्वेश्यानिशीथेविधवाभवेत्॥पूर्वरात्रेतथावं
ध्यादुर्भगासर्वसंधिषु ४२

**अर्थ-** प्रथम ऋतु पूर्वाण्ह काळीं प्राप्त जाहला असतां सुभगा, मध्यान्ह काळीं प्राप्त झाला असतां निर्धना, तिसरे प्रहराचें फळ अशुभ सायंकाळाचें

फळ सर्व भोगिनी, उभय संधीस वेश्या, मध्यरात्रीस विधवा, पूर्वरात्रीस वांझ, सर्व संधीस दुर्भगा अशीं फळें जाणावीं

नेसलेल्या वस्त्रांचें फळ स्वभगाश्वेतवस्त्राचरोगिणीरक्तवस्त्रका॥नीलांबरधरानारीविधवापुष्पवत्यपि॥४३॥

भोगिनीपीतवस्त्राचमिश्रवस्त्रावरप्रिया॥सूक्ष्मास्यात्सूक्ष्मवस्त्राचदृढवस्त्रापतिव्रता॥४४॥दुर्भगाजीर्णवस्त्राचस्वभगामध्यवाससा॥धूतवस्त्राशुभानारीमलिनेमलिनीभवेत्॥४५॥

अर्थ- प्रथम ऋतु प्राप्त होतो ते समयीं नेसलेलें वस्त्र पांढरें असेल तर स्वभगा, तांबड्यावर रोगिणी, निळ्यावर विधवा, पिंवळ्यावर भोगिनी, मिश्रवर्णावर पतिप्रिया, बारीक वस्त्र असल्यास शरीर कृश, बळकट वस्त्रावर पतिव्रता, जुन्या फाटक्यावर दुर्भगा, मध्यमावर स्वभगा, धुतलेल्या वस्त्रावर शुभ, मळकट वस्त्र असल्यास मलिन फल जाणावें

गर्भाधानास मुहूर्त ऋतौतुप्रथमेकार्यंपुन्नक्षत्रेशुभेदिने॥मघामूलांत्यपक्षांतस्त्यक्त्वाचंद्रबलेसति॥ ४६॥

अर्थ- प्रथम ऋतु प्राप्त झाल्यावर पुन्नक्षत्रीं शुभदिवसीं, मघा, मूळ, रेवती, अमावास्या, पूर्णिमा वर्ज्य करून उक्तचंद्र बळ पाहून मुहूर्त योजावा.

ऋतूंच्या षोडशरात्रींचें शुभाशुभ फळ ऋतुःस्वाभाविकःस्त्रीणांरात्रयःषोडशस्मृताः॥तासामाद्याश्चतस्रस्तुनिंदितैकादशीचया॥४७॥त्रयोदशीचशेषाःस्युःप्रशस्तादशवासराः॥तस्मात्त्रिरात्रंचांडालीपुष्पितांपरिवर्जयेत्॥४८॥

अर्थ- ऋतु प्राप्त जाहल्यापासून स्वभावें करून स्त्रीचे ठायीं सोळा रात्रीं असतो त्यामध्यें प्रथम ३ रात्रीं पुष्पवती चांडाली सम होय आणि ४ थी, ११ वी, १३ वी. ह्या निंदित रात्रि वर्ज्य करून शेष १० रात्रि शुभ होत.

रात्रौचतुर्थ्यांपुत्रःस्यादल्पायुर्धनवर्जितः॥पंचम्यांपुत्रिणीनारीषष्ठ्यांपुत्रस्तुमध्यमः॥४९॥सप्तम्यामप्रजायोषिदष्टम्यामीश्वरःपुमान्॥नवम्यांस्वभगानारीदशम्यांप्रवरःसुतः॥५०॥एकादश्यामधर्म्यःस्याद्द्वादश्यांपुरुषोत्तमः॥त्रयोदश्यांसुतापापावर्णसंकरकारिणी॥५१॥धर्मज्ञश्चकृतज्ञश्चआत्मवेदीदृढव्रतः॥प्रजायतेचतुर्दश्यांपंचदश्यांपतिः-

मता ॥ आश्रयः सर्वभूतानां षोडश्यां जायते पुमान् ॥५२॥

**अर्थ-** चौथे रात्रीस स्त्रीसंग केला असतां अल्पायुषी आणि धनवर्जित-असा पुत्र होतो. पंचम रात्रीस कन्या षष्ठरात्रीस मध्यम पुत्र, सप्तम रात्रीस आपत्य होणार नाहीं, ८ रात्रीस पुत्र ईश्वरभक्त, ९ रात्रीस सौभाग्य वृद्धि, १० रात्रीस गुणवान् पुत्र, ११ रात्रीस अधार्मिक पुत्र, १२ रात्रीस उत्तम पुरुष, १३ रात्रीस पापकर्मी कन्या, १४ रात्रीस धर्म, कृतज्ञता जाणणारा आणि आत्मचेना व दृढव्रत करणारा असापुत्र होईल, १५ वे रात्रीस पतिव्रता कन्या व १६ वे रात्रीस सर्व भूतांस आश्रय देणारा असा पुत्र होईल.

तिथिवारमु० ॥ ॥ षष्ठ्यष्टमीपंचदशीचतुर्थीचतुर्दशीमप्युभयत्रहित्वा ॥ शेषाः शुभाः स्युस्तिथयो निषेके वाराः शशांकेज्यसितेंदुजाश्च ॥५३॥

**अर्थ-** षष्ठी, अष्टमी, पूर्णिमा, अमावास्या, चतुर्थी आणि चतुर्दशी ह्या तिथि वर्ज करून शेषतिथि शुभ होत आणि सोमवार, गुरुवार, शुक्रवार, बुधवार हे वार शुभ जाणावे.

नक्षत्रफळ ॥ विष्णुप्रजेश्वरविमित्रसमीरपौष्णामूलोत्तरावरुणभानिनिषेककार्ये ॥ पूज्यानिपुष्यवसुशीतकराश्विचित्रादित्याश्चमध्यमफलाविफलाः स्युरन्ये ॥ ५४ ॥

**अर्थ-** श्रवण, रोहिणी, अनुराधा, हस्त, स्वाती, रेवती, मूळ, तीन उत्तरा, शततारका, हीं नक्षत्रें उत्तम होत. पुष्य, धनिष्ठा, मृग, अश्विनी, चित्रा, पुनर्वसु, हीं मध्यम आणि अन्य राहिलेलीं कनिष्ठ होत. मुहूर्तमार्तंडमतें वैधृति, संक्रांति, महापातादि दुष्टयोग. श्राद्धांत पूर्वदिवस, जन्मनक्षत्रादि, संधि दिवस, रात्रि नक्षत्र इत्यादि वर्ज करून ज्या लग्नीं विषम स्थानीं राशिनवांशीं उच्चींचा बृहस्पति अथवा सूर्य किंवा चंद्र असेल तें लग्न घ्यावें म्हणजे पुत्रप्राप्ति आणि हेच ग्रह समराशीस असले तर कन्याप्राप्ति होईल.

प्रथमगर्भिणीचेपुंसवनादिकसंस्कार ॥ ॥ मूलादित्रितये क्रूरेश्रवणकेभाद्रद्वयार्द्राद्वयेरेवत्यांमृगपंचकेदिनकरेभौमेनरिक्तातिथौ ॥ नेत्रेमास्यथवाग्निमासिधनुषिस्त्रीमीनयोश्चस्थिरेलग्नेपुंसवनंतुथैवशुभदंसीमंतकर्माष्टमे ॥ ५५ ॥

मृगांत पंचक मृगपंचक

अर्थ- मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, हस्त, श्रवण, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, आर्द्रा, पुनर्वसू, पुष्य, रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृग आणि रवि भौम हे वार उक्त व रिक्तातिथि वर्ज करून अन्यतिथि, गर्भधारण झाल्यापासून द्वितीय अथवा तृतीय हे मास आणि धन, कन्या, मीन, हीं लग्नें व स्थिर लग्नें पुंसवनास उक्त होत आणि हींच लग्नें अष्टममासीं सीमंत कर्मास घेण्यास उक्त होत.

वारफळें मृत्युश्च सौरेस्तनुहानिरिंदोः प्रजामृतिः पुंसवनेबुधस्य॥ काकीचवंध्याभवतीहशुक्रेस्त्रीपुत्रलाभोरविभौमजीवे॥५६॥

अर्थ- शनिवारीं पुंसवन केलें असतां मृत्यु, इंदुवारीं शरीराचानाश, बुधवारीं शिशु मरतील, शुक्रवारीं काकवंध्या (एकवार प्रसूती) रवि, भौम, गुरु या वारीं पुत्र लाभ होईल परंतु चंद्रानुकूल्य पाहून दुष्टयोगादिक वर्ज करून वर सांगितलेल्या उक्तनक्षत्रादि शुभदिनीं पुंसवन (पुरुषाकृति गर्भ व्हावा म्हणून पुंसवन नामक संस्कार करतात) करावें अनवलोभनस्याप्ययमेव कालः याच मुहूर्तीं गर्भाची स्थिरता व्हावी म्हणून अनवलोभन उक्त होय.

अन्यमत.

सीमंतोन्नयन्न आणिविष्णुबलि॥ चतुर्थषष्ठाष्टममासभाजिसौरेणगर्भेप्रथमंविधेयं॥ सीमंतकर्मद्विजभामिनीनां मासेऽष्टमेविष्णु बलिंचकुर्यात्॥५७॥

अर्थ- प्रथम गर्भधारण झाल्या पासून चौथा, सहावा, आठवा असे सममास सौरमानें करून घ्यावे. सीमंत कर्म आणि अष्टम मासीं विष्णुबलि हीं ब्राह्मणस्त्रियांस उक्त होत.

सीमंतेतिष्यहस्तादितिहरिशशभृत्पौष्णविध्युत्तराख्या पक्षच्छिद्रांचरिक्तांपितृतिथिमपहायापराः स्युः प्रशस्ताः॥५८॥

अर्थ- सीमंत कर्मास नक्षत्र पुष्य, हस्त, पुनर्वसू, श्रवण, मृग, रेवती, रोहिणी, तीन उत्तरा हीं शुभ होत. पक्षच्छिद्रातिथि, रिक्ता, आणि पितृतिथि वर्ज करून शेष राहिलेल्या तिथि शुभ जाणाव्या.

पक्षच्छिद्रातिथि चतुर्दशीचतुर्थीच अष्टमीनवमीतथा॥ षष्ठीचद्वादशीचैवपक्षच्छिद्राह्वयाः स्मृताः॥५९॥

मादेतास्कतिथिषुवर्जनीयाश्चनाडिकाः॥ भूतोष्टामनुतत्वां कदशशेषास्कशोभनाः॥५९॥

अर्थ- चतुर्दशीच्या १४ घटिका प्रथम वर्जाव्या. चतुर्थीच्या ८, अष्टमीच्या १४, नवमीच्या २४, षष्ठीच्या ९. द्वादशीच्या, १० अशा घटिका टाकून शेषतिथि उक्त होत.

गर्भिणीधर्म भूम्यांचैवोच्चनीचायामारोहणवरोहणे नदीप्रतरणंचैवशकटारोहणंतथा॥ ६०॥उग्रौषधंतथाक्षारंमैथुनभारवाहनं॥ कृतेपुंसवनेचैवगर्भिणीपरिवर्जयेत ६१

अर्थ- पुंसवन जाहल्यावर गर्भिणी स्त्रीनें उंच, नीच भूमीवर चढणें, उतरणें, फार चालणें, झाडावर, चढणें, वाहते नदींत जाणें, गाड्यावर बसणें, तीक्ष्ण औषधें घेणें, खारट पदार्थ खाणें, मैथून करणें, ओझें घेणें हीं सर्व कृत्यें वर्जावीं.

गर्भिणीप्रश्न नामाक्षराणित्रिगुणीकृतानितुरंगदेशेतिथिमिश्रितानि॥ अष्टाचभागंलभतेचशेषंसमेचकन्याविषमेचपुत्रः॥६१॥

अर्थ-गर्भिणीचीं नामाक्षरें त्रिगुणित करून त्यांत घोड्याचीं नामाक्षरें व देशाचीं अक्षरें व चालती तिथि मिळवून सर्व संख्येस ८ नीं भागावें. शेष अंक सम उरेल तर कन्या होईल. व विषम उरेल तर पुत्र होईल.

प्रसूतिस्थानीप्रवेशासनक्षत्रें॥ ॥रोहिण्यैंदवपौष्णेपुस्वातीवारुणयोरपि॥ पुनर्वसोपुष्यहस्तधनिष्ठाश्चुत्तरास्कच॥ ६३॥ मैत्रत्वाष्ट्रतथाश्विन्यासूतिकागारवेशनं॥ प्रसूतिसंभवेकालेसद्यएवप्रवेशयेत्॥ ६४॥

अर्थ- रोहिणी, मृग, रेवती, स्वाती, शततारका, पुनर्वसु, पुष्य, हस्त, धनिष्ठा, तीन उत्तरा, अनुराधा, चित्रा, आश्विनी हीं नक्षत्रें प्रसूतिकागार प्रवेशास उक्त होत किंवा प्रसूतिसमय प्राप्त झाला असतां तत्कालींच प्रवेश करावा. नक्षत्र विचार करूं नये.

प्रसूतिसमयींखोलींतीलपदार्थसांगावयाचाप्रश्न. मीनेमेषेस्त्रियोहेचचतस्त्रोवृषकुंभयोः॥तुलाकन्यकयोःसप्तबाणाश्व्याधनकर्कयोः॥ ६५॥ अन्यलग्नेभवंस्तिस्रएवंज्ञेयं

विचक्षणैः॥ यत्रराहुस्तत्रशय्याभौमेखड्गांगभंगता॥ रवि
स्थानेभवेद्दीपः शनिस्थानेतुनालकं॥ ६६॥

अर्थ- मीन अथवा मेष यालग्नीं प्रसूति झाली तर तिचे जवळ दोन स्त्रिया आहेत; वृषभ, कुंभ या लग्नीं चार स्त्रिया; तूळ, कन्या यालग्नीं सात स्त्रिया; धन, कर्क या लग्नीं पांच स्त्रिया आणि अन्यलग्नीं तीन स्त्रिया जाणाव्या. लग्नकुंडली मांडून ज्या दिशेस राहु त्या दिशेस शय्या; भौम लग्नीं असला तर खड्ग मोडकी; ज्यास्थानीं रवि असेल त्या स्थानीं दीप आणि ज्यास्थानीं शनि असेल त्या स्थानीं मुलाचें नाळ असें जाणावें.

तिथिगंडांत॥ ॥पूर्णानंदाख्ययोस्तिथ्योः संधिनाडि
द्वयंतथा॥ गंडांतमृत्युदं जन्मयात्रोद्वाहव्रतादिषु॥ ६७॥

अर्थ- पूर्णिमेची अंत्यघटिका आणि प्रतिपदेची आद्य घटिका असा दोहींचा संधि; याच क्रमानें पंचमी, षष्ठी; दशमी, एकादशी ह्या संधीच्या दोन दोन घटिका वर्जाव्या. यास तिथिगंडांत म्हणावें.

लग्नगंडांत॥ ॥कुलीरसिंहयोःकीटचापयोर्मीनमेषयोः
गंडांतमंतरालंस्याद्घटिकार्धंमृतिप्रदं॥ ६८॥

अर्थ- कर्क, सिंह ह्या दोन लग्नांचा संधि अर्ध अर्ध घटिका याच क्रमानें- वृश्चिक आणि धन, मीन आणि मेष यांचा संधि वर्ज करावा- ती एक घटिका मृत्युप्रद जाणावी.

नक्षत्रगंडांत॥ ॥पौष्णाश्विन्योः सार्पपित्र्यर्क्षयोश्च
यच्चज्येष्ठामूलयोरंतरालं॥ तद्गंडांतं स्याच्चतुर्नाडिकंहिया
त्राजन्मोद्वाहकालेष्वनिष्टं॥ ६९॥

अर्थ- रेवती, अश्विनी यांच्या संधीच्या २ दोन घटिका याचक्रमानें आश्लेषा आणि मघा, ज्येष्ठा आणि मूळ अशा संधीच्या चार चार घटिका वर्जाव्या. असें हे त्रिविध गंडांत ( वर सांगितलेलीं तिथि, लग्न, नक्षत्रात्मक तीन गंडांतें यास त्रिविध गंडांत ) म्हणावें. हें यात्रेस जाण्यास व जन्मवेळीं व विवाहास नसावें.

जन्मकाळाचें शुभाशुभ फळें अश्विनीमघामूलानांपू
र्वार्द्धे बाध्यतेपिता॥ पूषादिशक्रपश्चार्धेजननीबाध्यतेशि
शोः॥ ७०॥ सर्वेषांगंडजातानांपरित्यागोविधीयते॥ वर्जयेद्दर्शनं

शावतच्चषाणमासिकभवेत्॥७१॥

**अर्थ-** अश्विनी, मघा, मूळ या नक्षत्रांच्या पूर्वार्धी जन्म झालें तर पित्यास वाईट; रेवती, ज्येष्ठा ह्या दोन नक्षत्रांच्या उत्तरार्धी जन्म झाल्यास मातेस वाईट आणि गंडांतीं जन्म झाल्यास मुलाचा त्याग करावा अथवा ६ महिने पर्यंत मुख पाहूं नये.

**कृष्णाचतुर्दशीचेंफळ** कृष्णपक्षेचतुर्दश्यांप्रसूतेःषड्विधं फलं॥ चतुर्दशींचषड्भागंकुर्यादादौशुभंस्मृतं॥७२॥द्वितीयेपितरंहंतितृतीयेमातरं तथा॥चतुर्थेमातुलंहंतिपंचमेवंशनाशनं॥ षष्ठेचधनहानिःस्यादात्मनोवंशनाशनं॥७३॥

**अर्थ-** कृष्ण चतुर्दशीस जन्म झाल्यास तिथीचे ६ भाग करावे. त्यांचीं फळें. प्रथम भाग शुभ, द्वितीय भाग पित्यास वाईट, तृतीय मातेस वाईट, चतुर्थ मातुळास, पांचवा वंशास सहावा धन आणि आत्मवंश नाशक असें जाणावें.

**अमावास्येचेंफळ** सिनीवाल्यांप्रसूतास्युदासीभार्यापशुस्तथा॥गजाश्वमहिषीचैवशक्रस्यापिश्रियंहरेत्॥७४॥कुहूप्रसूतिरत्यर्थंसर्वदोषकरीस्मृता॥यस्यप्रसूतिरेतेषांतस्यायुर्धननाशनं॥७५॥सर्वेगंडसमस्तत्रदोषस्तत्प्रबलोभवेत्॥७६॥

**अर्थ-** चतुर्दशी युक्त अमावास्येस दासी, भार्या, गाय, हत्तीण, घोडी आणि म्हैस यांची प्रसूति झाली असतां स्वामीची संपत्ति जाईल. आणि प्रतिपद्युक्त अमावास्येस प्रसूति झाली असतां पुष्कळ दोष आणि स्वामीच्या आयुष्याचा व धनाचा नाश व त्रिविधगंडांतासम प्रबल दोष कारिणी ही प्रसूति होय असें जाणावें.

**दिनक्षयादि** दिनक्षयेव्यतीपातेव्याघातेविष्टिवैधृतौ॥शूलेगंडेतिगंडेचपरिघेयमघंटके॥७७॥कालदंडेमृत्युयोगेदग्धयोगेस्फुदारुणे॥तस्मिन्गंडदिनेप्रासेप्रसूतिर्यदिजायते॥ अतिदोषकरीप्रोक्तातत्रपापयुतेसति॥७८॥

**अर्थ-** दिनक्षय, व्यतीपात, व्याघात, कल्याणी, वैधृति, शूळ, गंड, अतिगंड, परिघार्ध, यमघंट, कालदंड, मृत्युयोग, दग्धयोग, दारुणयोग यांतून कोणत्याही दुष्टयोगीं गंडांत प्राप्त झालें असतां त्यासमयीं प्रसूति झाल्यास ती अति

दोषा वह होय.

ज्येष्ठानक्षत्राचें फळ ज्येष्ठादौजननीमाताद्वितीयेजननीपिता ॥ तृतीयेजननीभ्राताश्चतुर्थेमातामाताचतुर्थके ॥ ७९ ॥ आत्मानंपंचमेहंतिषष्ठेगोत्रक्षयोभवेत् ॥ सप्तमेचोभयकुलंज्येष्ठभ्रातरमष्टमे ॥ नवमेश्वशुरंहंतिसर्वंहंतिदशांशकः ॥ ८० ॥

अर्थ- ज्येष्ठानक्षत्रावर जन्म झालें असतां त्या नक्षत्राचे ६ घटिकां प्रमाणें भाग १० करावे आणि पुढें लिहिल्या प्रमाणें फळें पहावीं. प्रथमभाग मातेच्या आईस वाईट, दुसरा भाग मातेच्या पित्यास, ३ रा भाग मातुळास, ४ था भाग मातेस, ५ वा भाग मुलास, ६ वा भाग गोत्रजांस, ७ वा भाग आईचे बापाच्या कुळास, ८ वा भाग वडील भावास, नववा भाग श्वशुरास आणि १० वा भाग सर्वांस वाईट असें जाणावें.

मूळनक्षत्राचें फळ मूलंस्तंभंत्वचाशाखापत्रंपुष्पंफलंशिखा ॥ वेदाश्वमुनयश्चैवदिशश्चवसवस्तथा ॥ ८१ ॥ नंदबाणरसारुद्रामूलभेदाःप्रकीर्तिताः ॥ मूलेमूलविनाशायस्तंभेहानिर्धनक्षयः ॥ ८२ ॥ त्वचिभ्रातृविनाशायशाखामातृविनाशकृत् ॥ पत्रेसपरिवारःस्यात्पुष्पेतुनृपवल्लभः ॥ ८३ ॥ फलेषुलभतेराज्यंशिखायामल्पजीवितं ॥ ८४ ॥

अर्थ- मूळ नक्षत्रास मूळवृक्ष असें नाम आहे त्याच्या सुमारें घटि ६० त्याचीं स्थानें असीं कीं, प्रथम चार घटी वृक्षाचें मूळ, त्यांत जन्म जाहलें असतां नाश; द्वितीय भाग ७ घटी स्तंभ, हानि व धनाचा नाश; ३ रा भाग १० घटी साल. भावास वाईट; ४ था भाग ८ घटी वृक्षाच्या खांद्या, मातेस वाईट; पांचवा भाग ९ घटी वृक्षपत्रें, परिवाराचा लाभ; सहावा भाग ५ घटी वृक्षांचीं पुष्पें, राजास प्रिय होतो; सातवा भाग ६ घटी वृक्षफळ, राज्य प्राप्ति; आठवा भाग ११ घटी, वृक्षाचा शेंडा, यांत जन्म जाहलें असतां अल्पायुषी होतो. असे आठ भाग मिळून एकंदर ६० घटिकांचें मान जाणावें.

## जन्मकाळीं मूळ नक्षत्र कोणते लोकीं आहे तें पहावयाचीं लग्नें.

वृषालिसिंहघटेचमूलंदिविस्थितंयुग्मतुलांगनांत्ये ॥ पाता-

लग्नंमेषधनुःकुलीरनक्रेषुमर्त्येष्वभिसंस्मरंति ॥ ८५ ॥

अर्थ- वृषभ, वृश्चिक, सिंह, कुंभ याचोहोंतून कोणत्याही लग्नीं जन्म जाहलें असतां त्या दिवशीं मूळनक्षत्र स्वर्गीं आहे; त्याचें फळ राज्यप्राप्ति. मिथुन, तूळ, कन्या, मीन या लग्नीं जन्म जाहलें असतां मूळ पाताळीं आहे; त्याचें फळ धनप्राप्ति, मेष, धन, कर्क, मकर यालग्नीं जन्म जाहलें तर मृत्युलोकीं आहे; त्याचें फळ सर्वकुटुंबास वाईट. असें बारा लग्नांचें फळ वेगळें वेगळें जाणावें.

आश्लेषानक्षत्राचानराकारवृक्ष मूर्धास्यनेत्रगलकां सयुगंचबाहुर्हृज्जानुगुह्यपदमित्यहिदेहभागाः॥बाणाद्रिने त्रहुतभुक्श्रुतिनागरुद्रषण्णंदपंचशिरसः क्रमशस्तुना- ः॥ ८६॥ राज्यंपितृक्षयोमातृनाशः कामक्रियारतिः॥ पितृभक्तोबलीस्वघ्नस्त्यागीभोगीधनीक्रमात् ॥ ८७ ॥ ॥

अर्थ- आश्लेषा नक्षत्राच्या घटिकांचीं नराकार स्थानें. प्रथम ५. घटिकामस्तक, याचें फळ राज्यप्राप्ति; द्वितीय ७ घ० मुख, हें पित्यास वाईट; तिसरा भाग २ घ० नेत्र, हा मातेस वाईट; ४ था भाग ३ घटी गळा, त्याचें फळ स्त्रीरत; ५ वा भाग ४ घ० दोन्ही खांदे, हा पितृभक्त होईल; ६ वा भाग ८ घटी दोन्ही बाहु, याचें फळ बळकट; ७ वा भाग ११ घ० हृदय, आत्मघाती; ८ वा भाग ६ घ० दोन्हीगुडघे, त्यागी; नववा भाग ९ घ० गुह्य, भोगी; १० वा भाग ५ घ० दोन्ही पाय, धनवान् होतो. या प्रमाणें ज्या भागांत जन्म होईल त्याचें फळ स्थान परत्वें जाणावें.

जन्मकाळींग्रहजसेपडतीलतर्शांत्यांचीफळें.

तनुस्थान् लग्नस्थितोदिनकरः कुरुतेऽगपीडांपृथ्वीसुतोपितनुतेरुधिरप्रकोपं ॥ छायासुतःप्रकुरुतेबहुदुःखभाजंजीवेंदुभार्गवबुधाःस्फरवकांतिदाःस्युः ॥ ८८ ॥

धनस्था० ॥ दुःखावहाधनविनाशकराःप्रदिष्टावित्तस्थितारविशनैश्चरभूमिपुत्राः॥ चंद्रोबुधःसुरगुरुर्भृगुनंदनोवा नानाविधंधनचयंकुरुतेधनस्थः॥ ८९ ॥

सहजस्थान भानुःकरोतिविरुजंरजनीकरोपिकीर्त्यीयुतंक्षितिसुतः प्रचुरप्रकोपं ॥ कर्कींदुबुधःसुधिषणंस्फवि नीनवंषस्त्रीणांप्रियंगुरुकवीरविजस्तृतीये ॥ १० ॥-

सुहृत्स्थान ॥ ॥ आदित्यभौमशनयः सुखवर्जितांगं कुर्वंति
जन्मनिनरं सुविरंचतुर्थे ॥ सोमोबुधः सुरगुरुर्भृगुनंदनोवासो
रव्यान्वितंचनृपकर्मरतंप्रधानं ११

सुतस्थान पुत्रेरविः प्रचुरकोपयुतंबुधश्चस्वल्पात्मजंशनि
धरातनुजावपुत्रं ॥ शुक्रेंदुदेवगुरवः सुतधामसंस्थाः कुर्वंति
पुत्रबहुलंसुखिनंसुरूपं ॥ १२ ॥

रिपुस्थान मार्तंडभूमितनुजौहतशत्रुपक्षंपंगुर्नरंरिपुगृहे
ष्वपिपूजनीयं ॥ काव्येंदुजौमतिविहीनमनल्परोगंजीवः करो
तिविकलंमरणंशशांकः ॥ १३ ॥

जायास्थान तिग्मांशुभौमरविजाः किलसप्तमस्थाः जायां
कुकर्मनिरतांतनुसंततिंच ॥ जीवेंदुभार्गवबुधाबहुपुत्रयुक्तां
रूपान्वितांजनमनोहररूपशीलां ॥ १४ ॥

मृत्युस्थान सर्वग्रहादिनकरप्रमुखानितांतंमृत्युस्थिता
वितनुतेकिलदुष्टबुद्धिं ॥ शस्त्राभिघातपरिपीडितदेहमेनंसौ
ख्यैर्विहीनमतिरोगगणैरुपेतं ॥ १५ ॥

धर्मस्थान धर्मस्थितारविशनैश्चरभूमिपुत्राः कुर्वंतिधर्म
रहितंविमतिंकुशीलं ॥ चंद्रोबुधोभृगुसुतः सुरराजमंत्रीधर्म
क्रियासुनिरतंकुरुतेमनुष्यं ॥ १६ ॥

कर्मस्थान आदित्यभौमशनयः किलकर्मसंस्थाः कुर्युर्न-
रंबहुकुकर्मरतंकुपुत्रं ॥ चंद्रः सुकीर्तिमुशनाबहुधनयुक्तंरू
पान्वितंबुधगुरूशुभकर्मभाजं ॥ १७ ॥

लाभस्थान लाभस्थितोदिनकरोनृपलाभयुक्तंतारापति
र्बहुधनंक्षितिजः क्षितीशं ॥ सौम्योविवेकसुभगंचधनायुषी
ज्यः शुक्रः करोतिसुगुणंरविजः सुकीर्तिं ॥ १८ ॥

व्ययस्थान सूर्यः करोतिपुरुषंव्ययगाधिशीलंकाणंशशी
क्षितिसुतोबहुपापभाजं ॥ चंद्रांगजोगतधनंधिषणः कृशांगं
शुक्रोबहुव्ययकरंरविजः सुनीचं ॥ १९ ॥

राहुकेतुफलंसर्वंमंदवत्कथितंबुधैः ॥ २० ॥

अर्थ- जन्मलग्नीं तन्वादि द्वादशभाव स्थानीं ज ज सूर्यादिग्रह येतील त्यां

चीं पृथक् पृथक् फलें जाणावयाचें कोष्टक आणि राहु, केतु यांचीं फलें शनि वत् आहेत असें जाणावें

## पुरुषजातक कोष्टक.

| ० | स्थानें | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि राहु केतु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तनु | अंगपीडा. | कांति आणि सुख | रक्तकोप | कांति आणि सुख. | कांति आणि सुख | कांति आणि सुख | अति दुःख दायक |
| २ | धन | अति दुःख व धननाश. | नानाप्रकारची संपत्तिप्राप्ति | दुःखप्राप्तिव धननाश | नानाप्रकार-चीसंपत्तिप्रा. | नानाप्रकार-चीसंपत्तीप्रा. | नानाप्रकार-चीसंपत्तिप्रा. | अति दुःख प्राप्ति व धनाचा नाश |
| ३ | सहज | निरोगी असेल. | कीर्ति मिळवील. | कोपयुक्त असेल | समृद्धि. | बुद्धिमान. | नानावेषधारण करणार. | स्त्रियांस प्रिय होईल. |
| ४ | सुहृत् | शरीरास पीडा बहुत होईल | सुख भोगील | शरीरास पीडा बहुत हो० | सुख भोगील. | सुख भोगील. | सुख भोगील. | शरीरास पीडा बहुत होतील |
| ५ | सुत. | मोठा रागीट होईल. | बहुत पुत्र होतील. | संतति होणार नाही | अल्पपुत्र संतति होई० | बहुत पुत्र होतील. | बहुत पुत्र होतील. | संतति होणार नाहीं |
| ६ | रिपु | शत्रूचा नाश करील. | मरण पावेल | शत्रूचा नाश करील. | बुद्धिहीन व बहुत रोगी. | शरीरविकलित असेल. | बुद्धिहीन व बहुत रोगी. | शत्रु गृहीं पूज्य होईल. |
| ७ | जाया | स्त्री दुष्टकर्मी रत व मत. अ. | स्त्री रूपवती व बहुपुत्र हो. | स्त्री दुष्टकर्मी रत व मत. अ. | स्त्री रूपवती मन हरण करणारी अशी सुस्वभावाची मिळेल व बहुत पुत्र होतील. | | | स्त्री दुष्टकर्मी रत व संतति अल्प |
| ८ | मृत्यु | सर्व ग्रहाचें फळ एकच आहे दुष्टबुद्धि व शस्त्राघातें करून शरीरास पीडा होतील आणि सौख्य रहित असेल. जो ग्रह या स्थानीं असेल तो या प्रकारचें फळ देणारा होईल. आणि रोगही करील. | | | | | | |
| ९ | धर्म | अधर्मी बुद्धिहीन, दुष्टशी | धार्मिक होईल | अधर्मी, बुद्धिहीन दुष्टशी. | निरंतर धर्म करील. | निरंतर धर्म करील | निरंतर धर्म करील. | अधर्मी, बुद्धिहीन व दुष्टस्वभावाचा असा होईल. |
| १० | कर्म | अत्यंत दुष्कर्मी व कुपुत्री | अत्यंत कीर्तिमान होईल | दुष्कर्मी व कुपुत्री होईल. | सत्कीर्तियुक्त होईल. | शुभकर्में करील. | संपत्तिमान होईल. | फार दुष्टकर्मी व कुपुत्री होईल. |
| ११ | आय. | राजाशीं समागम करील. | धनपुष्कळ मिळविल. | पृथ्वीचे राजापाशीं हो. | विवेकयुक्त व सुंदर होईल | धन व आयवृद्धि पावेल. | गुणवान असेल. | चांगली कीर्ति मिळवील. |
| १२ | व्यय | दुष्टशील होईल. | काणा होईल | पापकर्में आचरेल. | गतधनी असेल. | कृशांग असेल | व्याधियुक्त असेल | नीबना असेल |

मुलाचेजन्मलग्नासमृत्युकारकग्रह चंद्राष्टमंचधरणीसुत सप्तमंचराहुर्नवंचशनिजन्मगुरुस्तृतीये॥ अर्कस्तुपंचभृगु-
षष्ठबुधश्चतुर्थेजातानजीवतिनरः प्रवदंतिसंतः॥ १०१॥

**अर्थ-** जन्मलग्नापासून चंद्र अष्टमस्थानीं, भौम सप्तम स्थानीं, राहु नवमस्थानीं, शनि जन्म लग्नीं, गुरु तृतीय स्थानीं, सूर्य पंचम स्थानीं, सूर्य पंचमस्थानीं, शुक्र षष्ठस्थानीं बुध चतुर्थस्थानीं असे ग्रह असले तर मूल वांचणार नाहीं.

जन्मलग्नीं मुलाचे बायकोस मृत्यकारक ग्रह॥ षष्ठेचभव नेभौमोराहुःसप्तमसंभवः॥ अष्टमेचयदासौरिस्तस्यभार्या नजीवति॥२॥

**अर्थ-** जन्मलग्नापासून षष्ठस्थानीं भौम सप्तमस्थानीं राहु, अष्टम स्थानीं शनि असा ग्रहांचा योग असल्यास त्या मुलाची बायको वांचणार नाहीं.

चांगले पराक्रमाचे ग्रह मूर्तौशुक्रबुधौयस्यकेंद्रेचैवबृहस्पतिः॥दशमोऽगारकश्चैवसज्ञेयःकुलदीपकः॥३॥

**अर्थ-** जन्मलग्नीं शुक्र आणि बुध, केंद्रीं (१।४।७।१० यास्थानांस केंद्र ह्मणतात, यांतून कोणत्याही स्थानीं) बृहस्पति आणि दशमस्थानीं भौम असे ग्रह असल्यास तो पुत्र कुलदीपक होईल असें जाणावें.

अपराक्रमी ग्रह सांगतो लग्नेशुक्रबुधौनैवकेंद्रेनास्ति बृहस्पतिः॥ दशमोगारकोनैवजातकंकिंकरिष्यति॥४॥

**अर्थ-** लग्नीं शुक्र बुध अथवा केंद्रीं गुरु किंवा दशम स्थानी अंगारक यांतून कोणताही ग्रह सांगितलेल्या स्थानीं नसला तर त्याचें जन्म होऊन व्यर्थ जाणावें.

जातिभ्रंशकारक.

धनस्थानेयदासौरिः सैंहिकेयोधरात्मजः॥शुक्रोगुरुः सप्तमेचत्वष्टमोरविचंद्रकौ॥५ ब्रह्मपुत्रपदेवापिवेश्यासुच सदारतिः॥ प्राप्तविंशतिमेवर्षेम्लेच्छोभवतिनान्यथा॥६॥

**अर्थ-** धनस्थानीं शनि, राहु, मंगळ अथवा सप्तम स्थानीं शुक्र, गुरु अष्टम स्थानीं रवि, चंद्र असे ग्रह असता ब्राह्मण जन्म असलें तथापि वेश्येसी निरंतर रत असेल आणि २० वर्षांचा झाला ह्मणजे म्लेच्छ होईल.

मातापितरांस नाशक षष्ठेचद्वादशेराशौयदापापग्रहो भवेत्॥तदामातृभयंविद्याच्चतुर्थेदशमेपितुः॥७॥

**अर्थ-** षष्ठ स्थानीं अथवा द्वादश स्थानीं पापग्रह असेल तर मातेस वाईट आणि चतुर्थ किंवा दशम या स्थानीं असला तर पित्यास वाईट.

नाशवंत ग्रह अर्कोराहुःकुजःसौरिर्लग्नेतिष्ठतिपंचमे॥पि

तरमातरहंतिभ्रातरश्च शिशुक्रमात् ॥ ८ ॥

**अर्थ-** जन्म लग्ना पासून पंचम स्थानीं रव्यादि पापग्रह आले तर त्याचीं फळें रवि आल्यास पित्यास वाईट; राहु मातेस; भौम आल्यास आणि शनि आल्यास मुलास मृत्युकारक असें क्रमें करून जाणावें.

लग्नस्थानेयदासौरिः षष्ठोभवतिचंद्रमाः ॥ कुजस्तु सप्तमस्थानेपितातस्यनजीवति ९

**अर्थ-** जन्मलग्नीं शनि, षष्ठस्थानीं चंद्र, सप्तमस्थानीं भौम असे ग्रह-असले तर पित्यास मृत्युकारक.

पातालस्थोयदाराहुश्चंद्रःषष्ठाष्टमेपिच ॥ पापदृष्टोविशेषेणसद्यःप्राणहरःशिशोः ॥ १० ॥

**अर्थ-** जन्मलग्नापासून सप्तमस्थानीं राहु, षष्ठ अथवा अष्टमस्थानीं चंद्र आणि विशेष पापग्रहांची दृष्टि असल्यास जन्म होतांच मृत्यु.

जन्मलग्नेयदाराहुःषष्ठोभवतिचंद्रमाः ॥ जातोमृत्युमवाप्नोतिकुदृष्ट्यात्वपमृत्युना ॥ ११ ॥

**अर्थ-** जन्मलग्नीं राहु, षष्ठस्थानीं चंद्र असें असल्यास जन्म होतांच मृत्यु व जन्मलग्नावर कुदृष्टि असली तर अपमृत्यु.

जन्मलग्नेयदाभौमश्चाष्टमेचबृहस्पतिः ॥ वर्षेचद्वादशे मृत्युर्देवोवैरक्षितायदि ॥ १२ ॥

**अर्थ-** जन्मलग्नीं मंगळ आणि अष्टमस्थानीं गुरु असें असलें तर बारावे-वर्षी शंकर रक्षित असला तरी मृत्यु.

शनिक्षेत्रेयदासूर्योभानुक्षेत्रेयदाशनिः ॥ वर्षेचद्वादशे मृत्युर्देवोवैरक्षितायदि ॥ १३ ॥

**अर्थ-** शनीचे गृहांत सूर्य किंवा सूर्याचे गृहांत शनि असें जन्मकाळीं असल्यास देव रक्षित असतांही १२ वे वर्षी मृत्यु.

षष्ठाष्टमस्थितोमूर्तौजन्मकालेयदाबुधः ॥ चतुर्थेवर्षे मृत्युश्चेयदिरक्षतिशंकरः ॥ १४ ॥

**अर्थ-** षष्ठ, अष्टम अथवा जन्मलग्न यांतून कोणत्याही स्थानीं बुध असला तर चतुर्थ वर्षी शंकर रक्षित असतांही मृत्यु.

भौमक्षेत्रेयदाजीवःषष्ठाष्टमश्चचंद्रमाः ॥ वर्षेऽष्टमे-

ऽपिमृत्कवैईश्वरोरक्षितायदि ॥ १५ ॥.

**अर्थ-** मंगळाचे घरात गुरु आणि षष्ठ अथवा अष्टमस्थानीं चंद्र असे असले तर ८ वे वर्षी ईश्वर रक्षित असतां ही मृत्कु.

दशमोपियदाराहुर्जन्मकालेयदाभवेत् ॥ वर्षेनुषोडशे ज्ञेयोबुधैमृत्कनरस्यच ॥ १६ ॥

**अर्थ-** जन्मलग्नापासून दशम स्थानीं किंवा जन्मलग्नीं राहु असला तर १६ वे वर्षी मृत्कु असें जाणावें.

ग्रहांच्यादृष्टी पादैकदृष्टिर्दशमेतृतीयेद्विपाददृष्टिर्नव पञ्चमेवा ॥ त्रिपाददृष्टिश्चतुरष्टमेचसपूर्णदृष्टिःसमसप्तके च ॥ १७ ॥ शनेस्त्रिदशमपूर्णादृष्टिर्जीवस्यकोणके ॥ बुधैर्ज्ञेयापूर्णदृष्टिर्भौमस्यचतुरष्टके ॥ १८ ॥

**अर्थ-** जन्म लग्नापासून दशम आणि तृतीय या स्थानीं जे ग्रह असतील त्यांची एकपाददृष्टि जन्मलग्नावर असते; याच क्रमानें नवपंचम स्थानीं असतील त्यांची द्विपाददृष्टि जाणावी आणि चतुर्थ, अष्टम या स्थानीं असतील त्यांची त्रिपाददृष्टि व सप्तम स्थानीं असतील त्यांची पूर्ण समदृष्टि जाणावी. जन्मलग्नापासून शनैश्वर दशमस्थानीं अथवा तृतीय स्थानीं असतां लग्नीं पूर्णदृष्टि; पचम किंवा नवमस्थानीं गुरु असतां त्याची लग्नावर पूर्ण दृष्टि आणि चतुर्थ किंवा अष्टमस्थानीं भौम असतां त्याची लग्नावर पूर्ण दृष्टि असते.

ग्रहांचें उच्चत्वनीचत्व रविर्मेषेतुलेनीचोवृषेचन्द्रस्तुवृश्चिके ॥ भौमश्चनक्रकर्केचत्रिषासोम्योझषेतथा ॥ १९ ॥ गुरुः कर्केचनक्रेचमीनकन्येसितस्यच ॥ मंदस्तुलायांमेषेचकन्याराहुग्रहस्यच ॥ २० ॥ राहुर्युग्मेतुचापेचतमोवत्केतुजफलं ॥ प्रोक्तंग्रहाणामुच्चत्वंनीचत्वंचक्रमाद्बुधैः २१.

**अर्थ-** रवि मेषींचा असल्यास उच्चत्व, तूळींचा असल्यास नीचत्व; चंद्र वृषभींचा असल्यास उच्चत्व, वृश्चिकींचा असला तर नीचत्व; भौम मकरींचा असलातर उच्चत्व, कर्कींचा असला तर नीचत्व; बुध कन्याराशीचा असला तर उच्चत्व, मकरींचा अ॰ नीचत्व; गुरु कर्कीचा उच्चत्व, मकरींचा नीचत्व; शुक्र मीनाचा उच्चत्व, कन्येचा नीचत्व; शनि तूळींचा उच्चत्व आणि मेषींचा नीचत्व; राहूचें कन्यागृह आणि मिथुन हीं उच्चत्वें आणि धनींचा नीचत्व. केतूचें-

फळ राहुवत् जाणावें.

जन्मलग्नाचीं फळें मेषेदैन्यमुपैतिगर्विततृषोनाना- मतिर्मन्मथः शूरः कर्कटकोधृतीन्वचनपेकन्याचमायान्वि तासत्यंचैवतुलेत्वलोमलिनतापापान्वितवैधनुर्मूर्खोयं मकरेघटेचतुरतामीनेत्त्वधीरामतिः ॥ २२ ॥

**अर्थ**-मेषलग्नीं जन्म झालें असतां दीनपणा, वृषभीं गर्वित, मिथुनीं नानाप्रकारच्या बुद्धि, कर्की मोठा शूर, सिंहलग्नीं धैर्यवान, कन्यालग्नीं अत्यंत मायावी, तूळीं सत्यवादी, वृश्चिकीं मलिनता, धनलग्नीं पापबुद्धि, मकरीं मूर्खपणा, कुंभी चतुरता आणि मीनीं अल्पधीरता अशीं जन्मलग्नाचीं फळें जाणा०

## स्त्रीजातक.

तनुस्थान मूर्तेःकरोतिविधवादिनकृत्कुजश्चराहुर्विनष्टतनयां रविजोदरिद्रां ॥ शुक्रःशशांकतनयश्चगुरुश्चसाध्वीं मायुःक्षयंचकुरुतेथचशर्वरीशः ॥ २३ ॥ धनस्थान कुर्वंतिभास्करशनैश्चरराहुभौमादारिद्र्यदुःखमतुलंवितयेद्वितीये ॥ वित्तेश्वरीमविधवांगुरुशुक्रसौम्यानारींप्रभूततनयांकुरुतेशशांकः ॥ ॥ २४ ॥ सहजस्थान सूर्येंदुभौमगुरुशुक्रबुधास्तृतीयेकुर्युःस्त्रियंबहुसुतांधनभागिनींच ॥ सत्यंदिवाकरसुतःकुरुतेधनाढ्यालक्ष्मींददातिनियतंकिलसैंहिकेयः ॥ २५ ॥ सुहृत्स्थान ॥ स्वल्पपयोभवतिसूर्यसुतेचतुर्थेदौर्भाग्यमुष्णकिरणःकुरुतेशशीच ॥ राहुर्विनष्टतनयांक्षितिजोल्पबीजांसौख्यान्वितांभृगुसुरेज्यबुधाश्चकुर्युः ॥ २६ ॥ सुतस्थान ॥ नष्टात्मजारविकुजौखलुपंचमस्थौचंद्रात्मजोबहुसुतांगुरुभार्गवौच ॥ राहुर्ददातिमरणंरविजस्तुरोगंकन्याप्रसूतिनिरतांकुरुतेशशांकः ॥ २७ ॥ रिपुस्था० ॥ षष्ठस्थिताःशनिदिवाकरराहुभौमाजीवस्तथाबहुसुतांधनभागिनींच ॥ चंद्रःकरोतिविधवांमुशनादरिद्रांवेश्यांशशांकतनयःकलहप्रियांच ॥ २८ ॥ जायास्था० ॥ सौरारजीवबुधराहुरवींदुशुक्रादद्युःप्रसह्यमरणंखलुसप्तमस्थाः वैधव्यबंधनभयंक्षयवित्तनाशंव्याधिप्रवासमरणानियतक्रमेण ॥ ॥ २९ ॥ ॥ मृत्युस्था० ॥ स्थानेष्टमेगुरुबुधौनियतंवियोगंमृत्युः -

शशीभृगुस्तनश्चतथैवराहुः॥ सूर्यःकरोतिविधवांधनिनींकुजश्च· सूर्यात्मजोबहुसुतापतिवल्लभांच॥३०॥ ॥धर्मस्था०॥ धर्मस्थिता भृगुदिवाकरभूमिपुत्रजीवाः सुधर्मनिरतांशशिजः सुभोगां॥राहुश्च· सूर्यतनयश्चकरोतिवंध्यांनारींप्रसूततनयांकुरुतेशशांकः॥३१॥ ॥ कर्मस्था०॥ राहुर्नभस्तलगतोविधवांकरोतिपापपरांदिनकरश्चशनैश्च रश्च॥ मृत्युंकुजोर्थरहितांकुटिलांचचंद्रः शेषाग्रहाधनवतींबहुवल्ल· भांच॥३२॥ आयस्था०॥ आयेरविर्बहुसुतांधनिनींशशांकः पुत्रा न्वितांक्षितिसुतोरविजोधनाढ्यां॥ आयुष्मतींसुरगुरुर्भृगुजःसुपुत्रीं राहुःकरोतिसुभगांसुखिनींबुधश्च॥३३॥ व्ययस्था०॥ अंतेधनव्य यवतींदिनकृद्दरिद्रांवंध्यांकुजःपरगतांकुटिलांचराहुः॥ साध्वींसितेज्यश शिजाबहुपुत्रपौत्रयुक्तांविधुःप्रकुरुतेव्ययगादिनाथा॥३४॥ अर्थ-

| स्था० | नावे | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि | राहु, केतु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | तनु | विधवा | आयुष्य नाश | विधवा | पतिव्रताहीनतीन्ही ग्रहांची फळे सप्तस्थानापर्यंत एकाप्रमाणेच | | | दरिद्री | पुत्रमरतील |
| २ | धन | दारिद्र्य दुःख | बहुपुत्रवती | दारिद्र्यदुःख | सौभाग्य व संपत्ति | | | दारिद्र्यदुःख | दारिद्र्यदुःख |
| ३ | सहज | पुत्रवती व धनाढ्य तीन्ही ग्रह फळ | | | पुत्रवती व धनाढ्य | | | लक्ष्मीयु० | लक्ष्मीयुक्त |
| ४ | सुहृद् | दारिद्र्यता | दौर्भाग्य | अल्पसंतति | अतिसौख्य· | | | दुग्धअल्प | पुत्रनाश· |
| ५ | सुत | मुलांचानाश | कन्यापुष्कळ | मुलांचा·ना· | बहुसुकप्राप्ति | | | रोगी | मरणपावेल. |
| ६ | रिपु | धनवती | विधवा | धनवती | कलहरूप अप्रिया· | धनवती· | दरिद्रीवेश्या | धनवती | धनवती· |
| ७ | जाया | रोगी | प्रवासी | विधवा | क्षय· | भयबंधन | मृत्यु | वैधव्य मरण | विघ्ननाश |
| ८ | मृत्यु | विधवा | मृत्यु | धनिनी | स्वजनवियोग | स्वजनवियोग | मृत्यु | बहुपुत्रसंततिवरप्रि | मृत्यु· |
| ९ | धर्म | धर्मपुष्कळकरील | संततियुक्त | धर्मकृत्यें करणारी | उत्तमभोग भोगील | धर्मवृद्धि | धर्मवृद्धि | वंध्या | वंध्या |
| १० | कर्म | पापकारिणी | दरिद्री जारिणी | मृत्यु | धनवतीव वरप्रिया | धनवती व वरप्रिया | | पापकारि० | वैधव्य· |
| ११ | आय | बहुपुत्रसंतति | लक्ष्मीयुक्त | बहुपुत्रवती | सुखभोगील | आयुष्मती | सुपुत्रवती | धनवती | सौभाग्यवती |
| १२ | व्यय | खर्चिक | दीनांध | दारिद्र्ययुक्त वंध्या | पुत्रपौत्रवती व पतिव्रता तीन्ही ग्रह फळ | | | खर्चिक | जारिणी व कुटिल |

## अष्टोत्तरीच्या महादशा.

आर्द्रापुनर्वसूः पुष्य आश्लेषा तुरवेर्दशा ॥ मघापूर्वोत्तराचैव चंद्रस्य च दशा तथा ॥ ३५ ॥ हस्तोविशाखा चित्राच स्वाती भौमदशा स्मृता ॥ ज्येष्ठानुराधा मूलंच सौम्यस्य च दशा बुधे ॥ ३६ ॥ अभिजिच्छ्रवणः पूषाउषाचैव शनेर्दशा ॥ धनिष्ठा शततारा च पूर्वाभाद्रपदा गुरोः ॥ ३७ ॥ उभा पूषाश्विनी काल राहोश्चैव दशा स्मृता ॥ कृत्तिका रोहिणी प्रोक्ता मृगः शुक्रदशा बुधैः ॥ ३८ ॥ एवं भानां क्रमेणैव ज्ञेयाः सूर्यादिका दशाः ॥ क्रूरजा अशुभाप्रोक्ता शुभा स्यात्सौम्यखेटजा ॥ ३९ ॥

## महादशाचा संख्याक्रम.

सूर्यस्य पंचवर्षाणि इंदोः पंचदशैव च ॥ भौमस्य वसुवर्षाणि ऋषिचंद्र बुधस्य च ॥ ४० ॥ मंदस्य दशवर्षाणि गुरोश्चैकोनविंशतिः ॥ राहोर्द्वादशवर्षाणि भार्गवस्यैकविंशतिः ॥ ४१ ॥

**अर्थ-** आर्द्रापासून आरंभ तो मृगापर्यंत २८ नक्षत्रें आणि रवि आदिकरून शुक्रापर्यंत ८ ग्रह यांचीं कोष्टकें पृथक् पृथक् केलीं आहेत त्यांजवरून महादशांची वर्षे संख्या आहे त्यांत पापग्रह नक्षत्रे चार चार आणि सौम्य ग्रहाचीं तीन तीन जाणावीं. दशांची संख्या भरून घेणें ती नक्षत्रांचे विभागानें घ्यावी आणि ज्या विभागांत जन्म होईल त्या प्रमाणें भोग्याभोग्य दशा जाणावी आणि जन्मकालीं जी दशा ती प्रथम जाणावी.

## अंतर्दशा आणावयाचा क्रम.

महादशा स्वस्वदशाब्दनिघ्ना भक्ता गजाकाशकुभिः समाद्याः अंतर्दशाः स्युर्गगनेचराणां तदेकभावोहि महादशा स्यात् ४२

**अर्थ-** ज्या ग्रहाची अंतर्दशा पाहिजे त्याच्या वर्षसंख्येनें महादशेची वर्षसंख्या गुणून १०८ नीं भागून जो भाग येईल तीं वर्षें जाणावीं आणि शेष उरेल तें १२ नीं गुणून पूर्ववत् भागून जे भाग येतील ते मास जाणावे आणि जें शेष उरेल तें तिसांनीं गुणून पूर्ववत् भागून जे भाग येतील ते दिवस जाणावे आणि जें शेष उरेल तें ६० नीं गुणून पूर्ववत् भागून जे भाग येतील त्या घटिका जाणाव्या असा क्रम महादशांतील अंतर्दशा पाहण्याचा जाणावा. १२० चा भाग विंशोत्तरीला घ्यावा.

| सूर्याची महादशा वर्षें ६<br>आर्द्रा पुनर्वसू पुष्य आश्लेषा. | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशाक्रम | | | | | |
| ग्रहनांवें | वर्षें | मास | दिव० | घटी. | फलें |
| रवि | ० | ४ | ० | ० | अशुभ |
| चंद्र | ० | १० | ० | ० | शुभ |
| मंगळ | ० | ५ | १० | ० | अशुभ |
| बुध | ० | ११ | १० | ० | शुभ |
| शनि | ० | ६ | २० | ० | अशुभ |
| गुरु | १ | ० | २० | ० | शुभ |
| राहु | ० | ८ | ० | ० | अशुभ |
| शुक्र | १ | २ | ० | ० | शुभ. |
| संख्या | ६ | ० | ० | ० | ० |

| चंद्राची महादशा वर्षें १५<br>मघा पूर्वा उत्तरा | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहनावें | वर्षें | मास | दिव० | घटी. | फलें |
| चंद्र | २ | १ | ० | ० | शुभ |
| भौम | १ | १ | १० | ० | अशुभ |
| बुध | २ | ४ | १० | ० | शुभ |
| शनि | १ | ४ | २० | ० | अशुभ |
| गुरु | २ | ७ | २० | ० | शुभ |
| राहु | १ | ८ | ० | ० | अशुभ |
| शुक्र | २ | ११ | ० | ० | शुभ |
| रवि | ० | १० | ० | ० | अशुभ |
| संख्या | १५ | ० | ० | ० | ० |

| भौमाची महादशा वर्षें ८<br>हस्त चित्रा स्वाती विशाखा. | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | | | |
| ग्रहनां० | वर्षें. | मास | दिव० | घटी | फलं |
| भौम | ० | ७ | ३ | २० | अशु० |
| बुध. | १ | ३ | ३ | २० | शुभ |
| शनि | ० | ८ | २६ | ४० | अशु० |
| गुरु | १ | ४ | २६ | ४० | शुभ |
| राहु | ० | १० | २० | ० | अशु० |
| शुक्र | १ | ६ | २० | ० | शुभ. |
| रवि | ० | ५ | १० | ० | अशु० |
| चंद्र | १ | १ | १० | ० | शुभ. |
| संख्या | ८ | ० | ० | ० | ० |

| बुधाची महादशा वर्षें १७<br>अनुराधा ज्येष्ठा मूळ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहनां० | वर्षें | मास | दिव० | घटी० | फलें |
| बुध | २ | ८ | ३ | २० | शुभ. |
| शनि | १ | ६ | २६ | ४० | अशुभ |
| गुरु | २ | ११ | २६ | ४० | शुभ. |
| राहु | १ | १० | २० | ० | अशु० |
| शुक्र | ३ | ३ | २० | ० | शुभ. |
| रवि | ० | ११ | १० | ० | अशु० |
| चंद्र | २ | ४ | १० | ० | शुभ. |
| भौम | १ | ३ | ३ | २० | अशु० |
| संख्या | १७ | ० | ० | ० | ० |

| शनीची महादशा वर्षे १० | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पूर्वाषा० उत्तराषा० अभिजि० श्रवण. | | | | | |
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहनां० | वर्षे. | मास. | दिव० | घटी. | फलें. |
| शनि | ० | ११ | ३ | २० | अशुभ |
| गुरु | १ | ९ | ३ | २० | शुभ. |
| राहु | १ | १ | १० | ० | अशु० |
| शुक्र | १ | ११ | १० | ० | शुभ. |
| रवि | ० | ६ | २० | ० | अशु० |
| चंद्र | १ | ४ | २० | ० | शुभ |
| भोम. | ० | ८ | २६ | ४० | अशु० |
| बुध. | १ | ६ | २६ | ४० | शुभ |
| संख्या. | १० | | | | |

| गुरूची महादशा वर्षे १९ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| धनिष्ठा शततारका पूर्वाभाद्रपदा. | | | | | |
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहनां० | वर्षे | मास | दिव० | घटी | फलें. |
| गुरु | ३ | ४ | ३ | २० | शुभ |
| राहु | २ | १ | १० | ० | अशु० |
| शुक्र | ३ | ८ | १० | ० | शुभ. |
| रवि | १ | ० | २० | ० | अशु० |
| चंद्र | २ | ७ | २० | ० | शुभ० |
| भोम | १ | ४ | २६ | ४० | अशु० |
| बुध. | २ | ११ | २५ | ४० | शुभ. |
| शनि | १ | ० | ३ | २० | अशु० |
| संख्या | १९ | | | | |

| राहूची महादशा वर्षे १२ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| उत्तराभाद्र० रेवती अश्विनी भरणी. | | | | | |
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहनां० | वर्षे. | मास | दिव० | घटी | फले. |
| राहु | १ | ४ | ० | ० | अशु० |
| शुक्र. | २ | ४ | ० | ० | शुभ. |
| रवि. | ० | ८ | ० | ० | अशु० |
| चंद्र | १ | ८ | ० | ० | शुभ. |
| भोम | ० | १० | २० | ० | अशु० |
| बुध. | १ | १० | २० | ० | शुभ. |
| शनि | १ | १ | १० | ० | अशु० |
| गुरु | २ | १ | १० | ० | शुभ. |
| संख्या | १२ | | | | |

| शुक्राची महादशा वर्षे २१ | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| कृत्तिका रोहिणी मृगशिर. | | | | | |
| अंतर्दशा. | | | | | |
| ग्रहनां | वर्षे. | मास. | दिव० | घटी. | फलें |
| शुक्र. | ४ | १ | ० | ० | शुभ. |
| रवि | १ | २ | ० | ० | अशु० |
| चंद्र | २ | ११ | ० | ० | शुभ. |
| भोम. | १ | ६ | २० | ० | अशु० |
| बुध. | ३ | ३ | २० | ० | शुभ |
| शनि | १ | ११ | १० | ० | अशु० |
| गुरु | ३ | ८ | १० | ० | शुभ. |
| राहु | २ | ४ | ० | ० | अशु० |
| संख्या. | २१ | | | | |

## विंशोत्तरीच्या महादशा व अंतर्दशा.

नयनोनजनुर्भमंकतष्टक्रमशोर्कॆंदुकुजागुरूरयः॥ शनिचंद्रजकेतुभार्गवाःपरिशेषात्तुदशाधिपास्ततः॥ ४३॥

**अर्थ-** जें जन्मनक्षत्र असेल त्यांत २ कमी करून नवांनीं भागावें आणि शेष १ उरला तर रवीची दशा आहे; २ उरले तर चंद्राची दशा; ३ उरले तर भौमाची दशा, ४ उरले तर राहूची दशा; ५ उरले तर गुरूची दशा; ६ उरले तर शनीची दशा; ७ उरले तर बुधाची दशा; ८ उरले तर केतूची दशा आणि भाग पुरला तर शुक्राची दशा आहे या प्रकारें दशाधिप जाणावे.

## दशांची वर्षसंख्या व भोग्याभोग्य.

ऋतुदिग्गिरयोधृतिर्नृपाऽनिधृतिर्मेघहयोनखाः समाः क्रमतोहिमता अथादिमाजानिभस्याघटिकाः समाहताः भभोगेनभक्ताः फलभुक्पाकस्तदूनादशासाभवेद्भोग्यसंज्ञा॥ ४४॥

**अर्थ-** ऋतु ह्मणजे ६, दिक् (१०), गिरी (७), धृति (१८), नृप (१६), अनिधृति (१९), मेघ (१७), हय (७) आणि नख (२०) हा वर्षसंख्याक्रम रव्यादि शुक्रांत ग्रह वर लिहिले आहेत त्यांचा जाणावा आणि जन्म नक्षत्राच्या आरंभापासून जन्म होण्याचे पूर्वीच्या घटिके पावेतों ज्या घटिका होतील त्यास नक्षत्राधिपतीचे वर्षांनीं गुणावें व जो गुणाकार येईल त्यास त्या नक्षत्रारंभापासून शेवटपर्यंत ज्या घटिका येतील त्यांणीं भागावें, जो भाग येईल तीं वर्षें. शेष राहिल त्यास अष्टोत्तरीस लिहिलें आहे त्या रीतीनें उत्तरोत्तर गुण्पून याच भाजकानें भागावें ह्मणजे मास, दिवस, घटिका येतील. नंतर त्या संख्या त्या दशाधिपतीचे वर्षांतून न्यून कराव्या आणि शेष राहील ती संख्या भोग्य आहे असें जाणावें.

## विंशोत्तरीक्रमकोष्टक.

कृत्तिकादिक्रमेणैवज्ञेयाविंशोत्तरीदशा॥ अंतर्दशायुतावर्षमासवासरवर्तिताः॥ ४५॥

**अर्थ-** कृत्तिकादि भरण्यंत २७ नक्षत्रें व दशा व अंतर्दशांचे अधिपतींचीं नांवें आणि त्यांच्या वर्षादि संख्या यांचें कोष्टक.

| सूर्याची महादशा वर्षे ६ कृत्तिका उत्तराफा० उत्तराषाढा | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | |
| नांवें | वर्षे | मास | दिवस |
| रवीची | ० | ३ | १८ |
| चंद्राची | ० | ६ | ० |
| भौमाची | ० | ४ | ६ |
| राहूची | ० | १० | २४ |
| गुरूची | ० | ९ | १८ |
| शनीची | ० | ११ | १२ |
| बुधाची | ० | १० | ६ |
| केतूची | ० | ४ | ६ |
| शुक्राची | १ | ० | ० |
| बेरीज. | ६ | | |

| चंद्राची महादशा वर्षे १० रोहिणी हस्त श्रवण. | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | |
| नांवें | वर्षे | मास | दिवस |
| चंद्राची | ० | १० | ० |
| भौमाची | ० | ७ | ० |
| राहूची | १ | ६ | ० |
| गुरूची | १ | ४ | ० |
| शनीची | १ | ७ | ० |
| बुधाची | १ | ५ | ० |
| केतूची | ० | ७ | ० |
| शुक्राची | १ | ८ | ० |
| रवीची. | ० | ६ | ० |
| बेरीज | १० | | |

| भौमाची महादशा वर्षे ७ मृग चित्रा धनिष्ठा | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | |
| नांवें | वर्षे | मास | दिवस |
| भौमाची | ० | ४ | २७ |
| राहूची | १ | ० | १८ |
| गुरूची | ० | ११ | ६ |
| शनीची | १ | १ | ९ |
| बुधाची | ० | ११ | २७ |
| केतूची | ० | ४ | २७ |
| शुक्राची | १ | २ | ० |
| रवीची | ० | ४ | ६ |
| चंद्राची | ० | ७ | ० |
| बेरीज | ७ | | |

| राहूची महादशा वर्षे १८ आर्द्रा स्वाती शततारका | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | |
| नांवें. | वर्षे | मास | दिवस. |
| राहु | २ | ८ | १२ |
| गुरु. | २ | ४ | २४ |
| शनि | २ | १० | ६ |
| बुध. | २ | ६ | १८ |
| केतु | १ | ० | १८ |
| शुक्र | ३ | ० | ० |
| रवि. | ० | १० | २४ |
| चंद्र | १ | ६ | ० |
| भौम. | १ | ० | १८ |
| बेरीज | १८ | | |

| गुरूचीमहादशावर्षे १६ पुनर्वसु विशाखा पूर्वाभाद्रप० | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | |
| नांवें | वर्षे | मास | दिवस |
| गुरु | २ | १ | १८ |
| शनि | २ | ६ | १२ |
| बुध | २ | ३ | ६ |
| केतु | ० | ११ | ६ |
| शुक्र | २ | ८ | ० |
| रवि | ० | ९ | १८ |
| चंद्र | १ | ४ | ० |
| मंगळ | ० | ११ | ६ |
| राहु | २ | ४ | २४ |
| बेरीज. | १६ | | |

| शनीची महादशा वर्षे १९ पुष्य अनुराधा उत्तराभाद्र० | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | |
| नांवें | वर्षे | मास | दिवस |
| शनि | ३ | ० | ३ |
| बुध | २ | ८ | ९ |
| केतू | १ | १ | ९ |
| शुक्र | ३ | २ | ० |
| रवि | ० | ११ | १२ |
| चंद्र | १ | ७ | ० |
| भौम | १ | १ | ९ |
| राहु | २ | १० | ६ |
| गुरु | २ | ६ | १२ |
| बेरीज | १९ | | |

| बुधाची महादशा वर्षे १७ आश्लेषा ज्येष्ठा रेवती | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | |
| नांवें | वर्षे | मास | दिवस |
| बुध | २ | ४ | २७ |
| केतु | ० | ११ | २७ |
| शुक्र | २ | १० | ० |
| रवि | ० | १० | ६ |
| चंद्र | १ | ५ | ० |
| भौम | ० | ११ | २७ |
| राहु | २ | ६ | १८ |
| गुरु | २ | ३ | ६ |
| शनि | २ | ८ | ९ |
| बेरीज | १७ | | |

| केतूची महादशा वर्षे ७ मघा मूळ अश्विनी | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा | | | |
| नांवें | वर्षे | मास | दिवस |
| केतु | ० | ४ | २७ |
| शुक्र | १ | २ | ० |
| रवि | ० | ४ | ६ |
| चंद्र | ० | ७ | ० |
| भौम | ० | ४ | २७ |
| राहु | १ | ० | १८ |
| गुरु | ० | ११ | ६ |
| शनि | १ | १ | ९ |
| बुध. | ० | ११ | २७ |
| बेरीज | ७ | | |

| शुक्राची महादशा वर्षे २० पूर्वाफा० पूर्वाषाढा भरणी | | | |
|---|---|---|---|
| अंतर्दशा. | | | |
| नांवें | वर्षे | मास | दिवस |
| शुक्र | ३ | ४ | ० |
| रवि | १ | ० | ० |
| चंद्र | १ | ८ | ० |
| भौम | १ | २ | ० |
| राहु | ३ | ० | ० |
| गुरु. | २ | ८ | ० |
| शनि | ३ | २ | ० |
| बुध | २ | १० | ० |
| केतु | १ | २ | ० |
| बेरीज | २० | | |

महादशांचीं अंतर्दशाफलें ॥ रविदशा ॥ देशांतरेचवि जबंधुवियोगदुःखमुद्वेगरोगभयचोरमहाचपीडा ॥ पूर्वास्थि तस्यनिखिलस्यधनस्यनाशोभानोर्दशाजननकालदशाभवति ४६

**अर्थ-** देशांतर करील; बंधुवियोगजन्य दुःख होईल; मन उद्विग्न असेल; रोगभय चोरपीडा आणि संचित धनाचा नाश अशीं सर्व फलें रविदशेंत प्राप्त होतात.

चंद्राचीअंतर्दशा.

हेमादिभूतिवरवाहनयानलाभंशत्रुमतापबलवृद्धिपरंपराच ॥ इ- ष्टान्नदानशयनासनभोजनानिनूनंसदाशशिदशागमनेभवंति ४७

**अर्थ-** ऐश्वर्य म्हणजे सुवर्णादि करून घोडे, रथ, पालख्या यांचा लाभ आणि शत्रूचा पराजय, बलाची वृद्धि अधिकाधिक आणि नाना प्रकारचीं सुरस अन्नें दान, शयनस्थान, उत्तम आसन, सुंदर भोजन असें सर्व चंद्राच्या दशेंत प्राप्त होतें.

भौमाचीअंतर्दशा

भूपालचोरभयवन्हिकृताचपीडासर्वांगरोगभयदुःखसुदुःखिता च ॥ चिंताज्वरश्चबहुकष्टदरिद्रयुक्तःस्यात्सर्वदाकुजदशागमनेभ वंति ॥ ४८ ॥

**अर्थ-** राजा आणि चोर यांपासून भय आणि अग्नीपासून पीडा, सर्वांग रोगी, भयानें सदा दुःखीत, नानाप्रकारची चिंता, ज्वर, अतिकष्ट आणि दरिद्रयुक्त हीं सर्व भौमाचे दशेंत प्राप्त होतात.

राहूचीअंतर्दशा

दीनोनरोभवतिबुद्धिविहीनचिंतासर्वांगरोगभयदुःखसुदुःखि- ताच ॥ पापानिबंधबहुकष्टदरिद्रयुक्तराहोर्दशाजननकालदशा भवंति ॥ ४९ ॥

**अर्थ-** मनुष्य दीन, बुद्धिहीन, चिंतायुक्त, सर्वदा शरीरास रोग, अत्यंत भय व दुःखित बंधन बहुत कष्ट, दरिद्रता हीं सर्व राहूचे दशेंत प्राप्त होतात.

गुरूचीअंतर्दशा.

राज्याधिकारपरिवर्धितनित्यशांतिधर्माधिकारपरिपालनसिद्ध बुद्धिः ॥ सौख्यमहापिधनधान्यसमृद्धताचस्यात्प्रबलागुरुदशा.

गमनेभवंति॥५०॥

अर्थ- राज्याधिकार, चित्तवृत्ति स्वस्थ, धर्माचे ठायीं बुद्धि, शरीरीं आरोग्य-ता आणि निश्चयें करून धनधान्यसमृद्धि इत्यादि गुरुदशेचीं फलें जाणावीं.

शनीची अंतर्दशा.

मिथ्यापवादवधबंधनमर्थहानिमित्रेषुबंधुवचनेषुचयुद्धबु-द्धिं॥सिद्ध्यतिकार्यमपियन्नसदाविनष्टंस्यात्सर्वदाशनिदशागमनेभवंति॥५१

अर्थ- मिथ्या आळ, दुसऱ्याचा घात, बंधन, द्रव्याचा नाश, बंधु आणि मित्र यांच्या बुद्धीनें कलह बुद्धि आणि जीं कार्यें सिद्धतीं नष्ट होतात. अशीं फलें शनिदशेचीं जाणावीं.

बुधाची अंतर्दशा

दिव्यांगनामदनसंगमकेलिसौख्यंनानाविलासमभिरागमनोभिरामे॥ हेमादिरत्नविभवागमकोशधान्यंस्यात्सर्वदाबुधदशागमनेभवंति ५२

अर्थ- सुंदरस्त्रीसौख्यप्राप्ति, सर्व प्रकारचे विलास भोग, सुवर्ण व रत्नें यांची अति प्राप्ति, धान्य संग्रह आणि ईश्वर ध्यान इत्यादि शुभ फलें बुध दशेंत जाणावीं.

केतूची अंतर्दशा

भार्यावियोगजनितंचशरीरदुःखंद्रव्यस्यहानिरतिकष्टपरंपराच॥रोगाश्चबंधुकलहश्चविदेशताचकेतोर्दशाजननकालदशाभवंति॥५३॥

अर्थ- स्त्रीवियोगापासून शरीरास दुःख, द्रव्याची हानि, बहुत कष्ट, रोग, बंधुकलह आणि देशांतर गमन इत्यादि अशुभफलें केतुदशेंत जाणावीं.

शुक्राची अंतर्दशा.

आरामवृद्धिरपिसर्वशरीरवृद्धिः श्वेतातपत्रधनधान्यसमाकुलंच॥आयुःशरीरसुतपौत्रसुखनराणाद्रव्यंचभार्गवदशागमनेभवंति॥५४॥

अर्थ- आरामस्थानाची प्राप्ति आणि शरीरपुष्टि; श्वेतछत्रप्राप्ति; धन, धान्य, आयुष्य, पुत्र आणि नातु यांची वृद्धि हीं शुभफलें शुक्राचे दशेंत प्राप्त होतात. हींच फलें महादशांचीं व अन्य सर्व संग्रहाचीं जाणावीं.

योगिनीदशांचाक्रम.

स्वर्क्षंपिनाकिनयनैः संयोज्यंवसुभिर्हरेत्॥ योगिन्योऽष्टौ समाख्याताः शून्यपातेनसंकटा॥५५॥

अर्थ-

जें आपलें जन्मनक्षत्र असेल त्यांत तीन अंक मिळवावे आणि आ

ठानीं भागून जो शेष अंक उरेल त्यावरून मंगलादि क्रमानें दशा जाणाव्या. यां चा क्रम कोष्टकांत लिहिला आहे.

**नांवें ॥ ॥ मंगलापिंगलाधन्याभ्रामरीभद्रिकापिच ॥ उल्कासिद्धासंकटाचयोगिन्यष्टौदशाःस्मृताः ॥ ५६ ॥**

**अर्थ-** मंगला, पिंगला, धन्या, भ्रामरी, भद्रिका, उल्का, सिद्धा आणि संकटा- हीं योगिनीचीं क्रमें करून नांवें जाणावीं.

**वर्षसंख्या ॥ ॥ एकद्वित्रीणिवेदाब्धिपंचषट्ससकानिच ॥ अष्टवर्षाणिहिभवेन्मंगलादावनुक्रमात् ॥ ५७ ॥ -**

**अर्थ-** मंगलादि दशांची नांवें पृथक् पृथक् व वर्षसंख्येचे दिवस करून त्यां त अंतर्दशा आणावयाचा क्रम. प्रथम दशेचें वर्ष १ त्याचे दिवस ३६० भाग ३६ चा देऊन भाग येईल त्याच्या अंतर्दशांचें स्पष्टीकरण व सर्व दशांचें कोष्टक- अनुक्रमें पाहण्याची रीति.

| मंगलेचेंवर्ष १ त्याचे दिव- स ३६० | | पिंगलेचीं वर्षें २ दिवस ७२० | | धन्येचीं वर्षें ३ दि १०८० | | भ्रामरी व. ४ दि. १४४० | | भद्रिका व. ५ दि. १८०० | | उल्का व. ६ दि. २१६० | | सिद्धा व. ७ दि. २५२० | | संकटा. व. ८ दि. २८८० | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मंगला. | १० | पिं. | ४० | ध. | ९० | भ्रा | १६० | भ. | २५० | उ | ३६० | सि. | ४९० | स | ६४० |
| पिंगला | २० | ध. | ६० | भ्रा | १२० | भ. | २०० | उ. | ३०० | सि | ४२० | सं. | ५६० | मं. | ८० |
| धन्या. | ३० | भ्रा. | ८० | भ. | १५० | उ. | २४० | सि. | ३५० | सं. | ४८० | मं. | ७० | पिं. | १६० |
| भ्रामरी | ४० | भ. | १०० | उ | १८० | सि. | २८० | सं. | ४०० | मं. | ६० | पिं. | १४० | ध. | २४० |
| भद्रि० | ५० | उ. | १२० | सि. | २१० | सं. | ३२० | मं. | ५० | पिं. | १२० | ध. | २१० | भ्रा | ३२० |
| उल्का. | ६० | सि. | १४० | सं | २४० | मं. | ४० | पिं. | १०० | ध. | १८० | भ्रा | २८० | भ | ४०० |
| सिद्धा. | ७० | सं | १६० | मं. | ३० | पिं. | ८० | ध. | १५० | भ्रा | २४० | भ. | ३५० | उ. | ४८० |
| संकटा | ८० | मं. | २० | पिं | ५० | ध. | १२० | भ्रा | २०० | भ. | ३०० | उ. | ४२० | सि | ५६० |
| बेरीज ३६० | | ७२० | | १०८० | | १४४० | | १८०० | | २१६० | | २५२० | | २८८० | |

ह्या योगिनीदशाक्रम ३६ वर्षांचा. तो भोगला म्हणजे पुनःपुनः हाच घ्यावा.

**दशापरत्वें फलें.**

**मंगलामंगलानंदयशोवृद्धिप्रदायिनी ॥ पिंगलातनुतेव्याधिंमनसादुःखसंभ्रमौ ॥ ५८ ॥ धन्याधन्यस्फलदद्धधरूपसंमतिनीकरी ॥ भ्रामरी-**

जन्मभूमिर्भ्रामयेत्सर्वतो दिशं ॥ ५९ ॥ भद्रिका सुखसंप त्तिविलासयशदायिनी ॥ उल्का राज्यधनारोग्यहारिणी दुःख कारिणी ॥ ६० ॥ सिद्धा साध्यते कार्यं नृणां वै सुखदा भवेत् ॥ सं कटा संकटव्याधिमरणक्लेशकारिणी ॥ ६१ ॥.

**अर्थ-** मंगलादशेचें फल, शुभकार्यें, आनंद, यश, द्रव्य यांतें देणारी; पिंग ला शरीरास व्याधि व मनास दुःख आणि भ्रम उत्पन्न करणारी; धन्यादशा फल, धन, सुहृद् बंधु यांची भेट, आरोग्यता आणि सुंदरपणा यांतें देणारी; भ्रामरीचें फल, स्थाननाशक आणि दिशाभ्रमण करविणारी; भद्रिकेचें फल सु ख, संपत्ति, विलास, यश इत्यादि देणारी; उल्का, राजभय, धननाश, रोगग्रस्त ता आणि पीडा करणारी; सिद्धाफल, कार्यसाधन आणि सुखप्राप्ति कर णारी; संकटा संकट, व्याधि, मरण आणि क्लेश यांतें करणारी होय.

## वर्षदशा.

रविदिननखसंख्या चंद्रमा व्योमबाणैः क्षितितनययुगजः खौ चंद्रजः षट्शराश्च ॥ शनिरसगुणसंख्या वाक्पतिर्नागबाणैर्न यनयुगकराहुः सप्ततिः शुक्रसंख्या ॥ ६२ ॥ जन्मनाविंशतिः सू र्यस्तृतीये दश चंद्रमाः ॥ चतुर्थे भौमस्याष्टौ च षष्ठे बुधचतुर्थकं ॥ ६३ ॥ सप्तमे दश सौरिः स्यान्नवपंचाष्टमे गुरुः ॥ दशमे राहुर्विंश त्यात्तदूर्ध्वं तु भृगोर्दशा ॥ ६४ ॥ फल. पृथाभोगो नुतापश्च सौख्यं पीडा धनक्रमात् ॥ नाशः शोकश्च सौख्यं च जन्म सूर्य दशाफल ॥ ६५ ॥

**अर्थ-** वर्षदशांच्या आरंभाचा क्रम ज्या महिन्यांत ज्याचे जन्मराशीस सूर्य येईल तो द्वादशस्थानें भोगतो. त्यांत सर्व ग्रहांच्या दशांचा क्रम अ नुक्रमें सांगतो.

२० दिवस सूर्याची दशा जन्मस्थानापासून जाणावी. तिचें फल मार्ग चालणें.

५० दिवस चंद्राची दशा तृतीयस्थानाचे १० दिवस रवि भोगतो त्याचें फल. उत्तम भोग भोगील.

२८ दिवस मंगळाची दशा चतुर्थस्थानाचे ८ दिवस रवि भोगतो. त्याचें फल. रोग आणि तप्तता होईल.

५६ दिवस बुधाची दशा षष्ठस्थानाचे ४ दिवस रवि भोगतो त्याचें फल-

सौख्यकारक होय.

३६ दिवस शनीची दशा, सप्तमस्थानाचे १० दिवस रवि भोगतो त्याचें फल पीडाकारक जाणावें

५८ दिवस गुरूची दशा, नवमस्थानाचे ८ दिवस रवि भोगतो, त्याचें फल धनप्राप्ति-जाणावी.

४२ दिवस राहूची दशा, दशमस्थानाचे २० दिवस रवि भोगतो त्याचें फळ नानाप्रकार-चे शोक.

७० दिवस शुक्राची दशा, द्वादशस्थानें संपूर्ण रवि भोगतो त्याचें फल सर्वसौख्य जाणावें.

या प्रकारें वर्ष दशा क्रम जाणावा.

## ग्रहांच्यानित्यानित्यदशांचाप्रकार

तिथिवारंचनक्षत्रंनामाक्षरसमन्वितं॥ नवभिश्चहरेद्भागंशेषंदिनदशोच्यते॥ ६६॥ रविचंद्रोभौमराहूगुरुमंदज्ञकेसिताः॥ क्रमेणैषनवज्ञेयाःफलपूर्वोक्तमेवहि॥ ६७॥

**अर्थ-** गततिथि, वार नक्षत्र, व आपले नांवाचीं अक्षरें अशी सर्व एकत्र करून त्यास ९ नीं भागावें. शेष १ उरला तर रवीची दशा, २ उरले तर चंद्राची, ३ उरले तर भौमाची, ४ उ० तर राहूची, ५ उ० तर गुरूची, ६ उरले तर शनीची, ७ उ० तर बुधाची, ८ उ० तर केतूची आणि भाग पुरला तर शुक्राची या प्रकारें नित्यदशा क्रमेंकरून जाणाव्या आणि यांची फलश्रुति जशी पूर्वी वर्षदशांची सांगितली आहे तशीच जाणावी.

## अन्यमतें.

जन्मताराचतुर्गुण्यातिथिवारेणमिश्रिता ॥ नवभिस्तुहरेद्भागंशेषंदिनदशोच्यते॥ ६८॥ फलें रविणाशोकसंतापौशशांकेक्षेमलाभकौ॥ भूमिपुत्रेतुमृत्युः स्याद्बुधेप्रज्ञाविवर्धनं॥ ६९॥ गुरौवित्तंभृगौसौख्यंशनौपीडानसंशयः॥ राहुणाघातप्राप्तिश्चकेतौमृत्युःदशाफलम्॥ ७०॥

**अर्थ-** जन्म नक्षत्र चतुर्गुणित करावें आणि त्यांत गततिथि व वार मिळवून सर्व-एकत्र करून ९ नीं भागावें. शेष १ उरला तर त्या दिवशीं रवीची दशा, तिचें फळ शोक संताप कारक; २ उरले तर चंद्राची, फल क्षेम लाभ करणारी; ३ उ० तर मंगळाची, फळ मृत्युकारक; ४ उ० तर बुधाची फल बुद्धीची वृद्धि; ५ उ० तर गुरूची, फल

चिंत माषि; ६ उरले तर शुक्राची, फल सौख्य कारक; ७ उरले तर शनीची दशा, पीडा कारक; ८ उरले तर राहूची दशा, फल घातक, ९ उरले तर केतूची दशा, फल मृत्यु या प्रकारें सूर्यादि नवग्रहांच्या दशा व फलें जाणावीं.

## गोचरप्रकरण.

### ग्रहकितीमासएकेकराशिभोगतोत्याचेंपरिमाण.

मासंशुक्रबुधादित्याः सार्धमासंतु मंगलः ॥ त्रयोदशगुरुश्चैव सपादद्वेदिनेशशी ॥ ७१ ॥ राहुरष्टादशान्मासांस्त्रिंशन्मासाञ्छनैश्चरः ॥ राहुवत्केतुरुक्तस्त्कराशिभोगाः प्रकीर्तिताः ॥ ७२ ॥ फलें सूर्यःपंच दिनंशशीत्रिघटिकाभौमोष्टवेवासरान्ससाह्लतुशनाबुधस्तुत्रिदिन मासद्वयंवैगुरुः ॥ षण्मासंरविजस्तथैवसततंस्वर्भानुमासद्वयंकेतो श्चैवतथाफलंगिरिमितंज्ञेयंग्रहाणांफलं ॥ ७३ ॥ राशिप्रवेशे सूर्यारौमध्येशुक्रबृहस्पती ॥ राहुचंद्रौशनिश्चांतेसौ म्यश्चैवसदाफलः ॥ ७४ ॥

**अर्थ**- ग्रह राशि भोगतात त्यांची मास संख्या आणि आदिं, मध्यें व अंतीं फल देतात त्यांचा दिवससंख्या क्रम अनुक्रमें सांगतों.

सूर्य- १ मासांत १ राशि भोगतो त्यांत प्रथम ५ दिवस फळ देतो

चंद्र- सवादोन दिवसांत १ राशि भोगतो त्यांत अंतींच्या ३ घटिका फल देतो.

मंगळ- दीड मासांत १ राशि भोगतो त्यांत प्रथम ८ दिवस फळ देतो.

बुध- १ मासांत १ राशि भोगतो त्याचे सर्व दिवस फल जाणावें.

गुरु- १३ मासांत १ राशि भोगतो त्याचें फल मध्य भागीं २ मास जाणावें.

शुक्र- १ मासांत १ राशि भोगतो त्याचें फल मध्यभागीं ७ दिवस जाणावें.

शनि- ३० मासांत १ राशि भोगतो त्याचें फल अंतींचे ६ मास जाणावें.

राहु- १८ मासांत १ राशि भोगतो त्याचें फळ अंतींचे २ मास जाणावें.

केतु- राहुवत् जाणावा.

### द्वादशभवनेंवत्यांचीफलें

### द्वादशस्थानांचींनांवें ॥

तन्वादौतनुधनसहजसुहृत्सुत तारिपत्नश्च ॥ आयामृत्यु धर्मकर्मायव्ययाख्यद्वादशभवनानि ॥ ७५ ॥

स्थानपरत्वें फलें ॥ ॥ सूर्यःस्थानविनाशंभयंभि-

यंमानहानिमथदैन्यं॥विजयंमार्गपीडासुतक्षतिंसिद्धिमायमथ
हानिं॥७६॥चंद्रोऽन्नंचधनसौख्यरोगकार्यक्षतिंश्रियं॥श्रियंमृ-
त्युंनृपभयसुखमायंव्ययंक्रमात्॥७७॥भौमोरिभीतिंधननाश
मर्थंभयंतथार्थक्षतिमर्थलाभं॥धनात्ययंशत्रुभयंचपीडांशोकंध
नहानिमनुक्रमेण॥७८॥बुधस्तुबंधंधनमन्यभीतिंधनंरुजंस्थान
मथोचपीडां॥अर्थंरुजंसौख्यमथात्मसौख्यमर्थक्षतिंजन्मगृहा-
त्करोति॥७९॥गुरुर्भयंधनक्लेशधननाशसुखंशुचं॥मानंरोगंसु-
खंदैन्यंलाभंपीडांचजन्मभात्॥८०॥कविःशत्रुनाशंधनंसौख्यम
र्थंसुतार्प्तिरिपोःसाध्वसंशोकमर्थं॥सुहृद्दत्स्थलाभंविपत्तिंधनाप्तिं
धनाप्तिंतनोत्यात्मनोजन्मराशेः॥८१॥शनिःसर्वनाशंतथावित्तना
शंधनंशत्रुवृद्धिंसुतार्थक्षतिंच॥श्रियंदोषसंधिंरिपुद्रव्यनाशंतथा
दौर्मनस्यंधनंवर्द्धनंथं॥८२॥राहुर्हानिंतथानैःस्वंधनंवैरंशुचंश्रियं॥
कलिंवसुंचदुरितंवैरंसौख्यंशुचंक्रमात्॥८३॥केतुःक्रमाद्रुजंवैरंसु
खंभीतिंशुचंधनं॥गतिंगदंदुष्कृतिंचशोकंकीर्तिंचशत्रुतां॥८४॥

कोष्टक.

| नांवें | रवि | चंद्र | मंगळ | बुध. | गुरु | शुक्र | शनि | राहु | केतु. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| तनु | स्थानना० | अन्नलाभ | शत्रुभय. | बंधन | भय | शत्रुनाश | सर्वनाश | हानि | रोग. |
| धन | भय. | धनप्रा० | धननाश. | धनप्रा० | धनप्रा० | धनप्राप्ति | वित्तनाश | धननाश | वैर. |
| सहज | लक्ष्मी | सुख | धनप्रा० | भीति | क्लेश | सौख्य. | धनला० | धनला. | सुख. |
| सुहृत् | मानहा. | रोग. | भय | धनप्रा० | धनना० | धनप्राप्ति | शत्रुवृ० | वैर | भय. |
| सुत | दैन्य | कार्यनाश | अर्थना. | रोगप्रा० | सुख | पुत्रप्राप्ति | सुतना० | शोक | शोक |
| रिपु | विजय. | लक्ष्मी | लाभ. | स्थानला० | शोक | रिपुभय. | धनला० | लक्ष्मी | धनप्रा० |
| जाया | मार्गक्रम | लक्ष्मी | धनना० | पीडा. | मान | शोक | दोष | कलह | मार्गक्रम |
| मृत्यु | पीडा. | मृत्यु | शत्रुभय. | अर्थप्रा० | रोग | अर्थप्रा० | रिपुभय | धनला० | रोग |
| धर्म | पुण्यना० | राजभय. | पीडा. | रोग. | सुख | सुहृद्स्थला० | धननाश | पापक० | दुष्टकर्म |
| कर्म | सिद्धि | सुख | शोक | सौख्य. | दैन्य. | विपत्ति | अस्वस्थ. | वैर | शोक |
| आय. | लाभ | लाभ | धनप्रा. | सौख्य. | लाभ | धनप्रा० | धनप्रा० | सौख्य. | कीर्ति |
| व्यय. | हानि | खर्च | हानि | धनना० | पीडा. | धनप्रा० | धनक्षय | शोक. | दुर्बुद्धि |

जन्मस्थचंद्रावरपंचकर्मेवर्ज्यं ॥ ॥ जन्मस्थर्क्षशशांकेतुपंचक र्माणिवर्जयेत् ॥ यात्रायुद्धंविवाहश्चक्षौरंचगृहवेशनं ॥ ८५ ॥

अर्थ- यात्रेस व युद्धास जाणें, विवाह, क्षौरकर्म आणि गृहप्रवेश अशीं हीं पांच कर्मे जन्मस्थ चंद्र असतां वर्जावीं.

नक्षत्रस्थानपरत्वेंचंद्राचेंबळउक्त.

द्विपंचनवमःशुक्ले श्रेष्ठश्चंद्रोहिउच्यते ॥ अष्टमोद्वादशःकृष्णेचतुर्थःश्रेष्ठउच्यते ॥ शुक्लपक्षेबलीचंद्रः कृष्णेताराबलीयसी ॥ ८६ ॥

अर्थ- दुसरे अथवा पांचवे किंवा नववे स्थानीं चंद्र असतां शुक्लपक्षीं श्रेष्ठ जाणावा. तसाच ८ वा, १२ वा अथवा ४ था कृष्णपक्षीं श्रेष्ठ परंतु शुक्लपक्षीं चंद्रबळ आणि कृष्णपक्षीं ताराबळ असें श्रेष्ठ होय.

अनिष्टस्थानस्थग्रहांच्या प्रसन्नते विषयीं.

येखेचरागोचरतोष्टवर्गाद्दशाक्रमाद्वाप्यशुभाभवंति ॥ दानादिनातेकृतरांप्रसन्नास्तेनाधुनादानविधिंप्रवक्ष्ये ८७

अर्थ- ग्रह गोचरींचा अथवा अष्टवर्गीचा किंवा दशाक्रमाचा जो अनिष्ट स्थानीं असेल त्यास प्रसन्न करण्याचीं दानें करावीं लागतात ह्मणून आतां दान विधि सांगतों.

वारपरत्वेंदानें ॥ ॥ भानुस्ताबूलदानादपहरतिनृणांवैकृतंवासरोत्थंसोमःश्रीखंडदानादवनितरकृतोभोजनात्पुण्यदानात् ॥ सौम्यःशास्त्रस्यमंत्राद्गुरुहरभजनाद्भार्गवःशुभ्रवस्त्रात्तैलस्नानात्प्रभातेदिनकरतनयोब्राह्मनत्यापरेच ॥ ८८ ॥

अर्थ- सूर्यास तांबूलदान, चंद्रास श्रीखंड (चंदन) मंगळास भोजन बुधास शास्त्रोक्त मंत्र जप, गुरूस सांबाचें आराधन, भजन, शुक्रास शुभ्र वस्त्र आणि शनिवारीं तैलाभ्यंग व विप्रास नमन याप्रकारें ज्या ग्रहांचे त्यावारीं दानादिक केलें ह्मणजे शुभफल प्राप्त होतें.

ग्रहांचींदानेंवजपसंख्या रवींचीं माणिक्यगोधूमसवत्सधेनुकौसुंभवासोगुडहेमताम्रं ॥ आरक्तकचंदनमबुजंचवदंतिदानंहिविरोचनाय ॥ ८९ ॥ चंद्राचीं सद्वंशपात्रस्थितंडुलांश्चकर्पूरमुक्ताफलशुभ्रवस्त्रं ॥ युगोपयुक्तं वृषभंचरौप्यंचंद्रायदद्याद्घृतपूर्णकुंभं ॥ ९० ॥ भौमाचीं प्रवालगो-

धूममसूरिकाश्चवृषो ऽरुणश्चापिगुडःसुवर्णं ॥ आरक्तवस्त्रंक
रवीरपुष्पंताम्रंचभौमायवदंतिदानं ॥ ९१ ॥ बुधाचीं चेलंचनी
लंकलधौतकांस्यंमुद्गाज्यगारुत्मतसर्वपुष्पं ॥ दासीचदंतोद्दिर
दस्यनूनंवदंतिदानंविधुनंदनाय ॥ ९२ ॥ गुरूचीं शर्कराचर-
जनीतुरगमःपीतधान्यमपिपीतमंबरं ॥ पुष्परागलवणसकांचनं
प्रीतयेसुरगुरोःप्रदीयते ॥ ९३ ॥ शुक्राचीं चित्रांबरंशुभ्र-
तुरंगमश्चधेनुश्चवज्रंरजतंसुवर्णं ॥ सतंडुलंचोत्तमगंधयुक्तंव
दंतिदानंभृगुनंदनाय ॥ ९४ ॥ शनीचीं माषाश्चतैलंविमलें
द्रनीलंतिलाःकुलित्थामहिषीचलोहं ॥ कृष्णाचधेनुःप्रवदंति
नूनंदुष्टाहिदानंरविनंदनाय ॥ ९५ ॥ राहूचीं गोमेदरत्नंच
तुरगमश्चसुनीलचेलामलकंबलाजाः ॥ तिलाश्चतैलंखलुलो
हमिश्रंस्वर्भानवेदानमिदंवदंति ॥ ९६ ॥ केतूचीं वैडूर्यरत्नं
सतिलंचतैलंसुकंबलंचापिमदोमृगस्य ॥ शस्त्रंचकेतोःपरितोष
हेतोश्छागस्यदानंकथितंमुनींद्रैः ॥ ९७ ॥ ग्रहांचाजप रवेः
सप्तसहस्राणिचंद्रस्यैकादशैवतु ॥ भौमेदशसहस्राणिबुधेचा-
ष्टसहस्रकं ॥ ९८ ॥ एकोनविंशतिर्जीवेशुक्रेएकादशैवतु ॥ त्रयो
विंशतिकंसौरेराहोरष्टादशैवतु ॥ ९९ ॥ केतोःसप्तसहस्राणि
जपसंख्याप्रकीर्तिता ॥ ४०० ॥

| ग्रह | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु. | शुक्र | शनि | राहु | केतु |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | माणिक. | रुपांतून. | पोंवळें. | नीलवस्त्र. | साखर. | चित्रवस्त्र | उडीद. | गोमेद. | वैडूर्य. |
| | गहूं | तांदूळ. | गहूं | सोने | हळद | श्वेताश्व | तेल. | घोडा | रत्न. |
| | सवत्सगो. | कापूर. | मसूरा | कांस्यपा. | घोडा | गाय | नीळ. | नीलवस्त्र | तिल. |
| | कौसुंभव | मोतिं. | तांबडाबैल. | मूग. | चण्याची | वज्र. | तिल. | कंबल | तैल. |
| | गूळ. | श्वेतवस्त्र. | गूळ | तूप. | डाळ. | रौप्य. | हुलगे. | तिल. | कंबल. |
| | सोनें. | जूयुक्तवृ | सोनें | गारुत्मत. | पीतवस्त्र. | सुवर्ण. | म्हैस. | तैल. | कस्तूरी. |
| | तांबें. | षभ. | रक्तवस्त्र. | सर्वपुष्पं | पुष्पराग. | तांदूळ. | लोखंड | लोह. | शस्त्र. |
| | रक्तचंदन. | रुपें. | कण्हेरीपु | दासी | मीठ. | चंदन. | कपिला. | काळेंपु. | मेंढा. |
| | कमल. | घृतपूर्ण. | ष्प. | हस्तिदंत | सोनें | ० | गाय. | ष्प. | ० |
| | ०. | कुंभ. | तांबें. | ० | ० | ० | ० | ० | ० |
| जपसंख्या | ७००० | ११००० | १०००० | ८००० | १९००० | ११००० | २३००० | १८००० | ७००० |

ग्रहपीडानिवारणार्थ॥ ॥ देवब्राह्मणवंदनाद्गुरुवचःसंपादनात्प्रत्यहंसाधूनामपिभाषणाच्छ्रुतिरवश्रेयःकथाकारणात्॥ होमादध्वरदर्शनाच्छ्रुतिमनोभावाज्जपाद्दानतोनोकुर्वंतिकदाचिदेवपुरुषस्यैवंग्रहाःपीडन॥ ४०१॥

अर्थ- देव आणि ब्राह्मण यांस नमन करावें; प्रतिदिवसीं गुरुवचनीं तत्परता असावी; साधुमुखांतून उत्तम कथा श्रवण कराव्या व होम, अध्वरदर्शन आणि मनोभावें करून जप व दान केलें असतां पीडा निरसन होऊन शुभ फल प्राप्त होईल.

जातकर्म जातेपुत्रेपिताकुर्यान्नांदीश्राद्धंविधानतः॥ जातकर्मततःकुर्यादन्यैरालंभनात्पुरा॥ २॥

अर्थ- पुत्र जनन झाल्यावर तत्काल पित्यानें नांदीश्राद्धोत्तर विधिपूर्वक शिशूस अन्यांनीं स्पर्श करण्या पूर्वी जातकर्म संस्कार करावा.

नामकर्म (नांवठेवणें) पुष्यार्कत्रयमैत्रभेतुमृगभेज्येष्ठाधनिष्ठोत्तरादित्याख्येषुचनामकर्मशुभदंयोगेप्रशस्तेतिथौ॥ अह्निद्वादशकेतथान्यदिवसेशस्तेतथैकादशेगोसिंहालिघटेषुचार्कबुधयोर्जीवेशशांकेपिच॥ ३॥

अर्थ- पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, मृग, धनिष्ठा, ३ उत्तरा, पुनर्वसु, हीं नक्षत्रें नामकर्मास उक्त आणि जन्मापासून १२ वा अथवा ११ वा दिवस उक्त. अन्यमतें १६ वा, २० वा, २२ वा, १०० वा हे ही उक्त, आणि वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ हीं लग्नें शुभ व रवि, बुध, गुरु, चंद्र, शुक्र हे वार शुभ-रिक्तातिथ्यादि दुष्टयोगादि वर्ज करून शुभ पाहून नांव ठेवावें.

नांवाचें अवकहडाचक्र॥ चूचेचोलाश्विनीप्रोक्तालीलूलेलोभरण्यथ॥ आईऊएकृत्तिकास्याद्ओवावीवूतुरोहिणी॥ ४॥ वेवोकाकीमृगशिरःकूघङछतथार्द्रका॥ केकोहाहीपुनर्वसुहूहेहोडातुपुष्यभं॥ ५॥ डीडूडेडोतुआश्लेषामामीमूमेमघा स्मृता॥ मोटाटीटूपूर्वफल्गुटेटोपाप्युत्तरातथा॥ ६॥ पूषाणाठाहस्तताराः पेपोरारीतुचित्रका॥ रूरेरोतास्मृतास्वातीतीतूतेतोविशाखिका॥ ७॥ नानीनूनेऽनुराधर्क्षेज्येष्ठानोयायियुस्मृता॥ येयोभाभीमूलतारापूर्वाषाढाबुधाफढा॥ ८॥ भेभोजाज्युत्तराषाढाजूजेजोखाऽभिजिद्भवेत्॥ खीखूखेखोश्रवणभंगागीगूगे

धनिष्ठिका॥९॥गोसासीसूशतभिषक्सेसोदादीनुपूर्वभाक्
दुझाआथोत्तराभाद्रादेदोचाचीनुरेवती॥१०॥

कोष्टक.

| | | | |
|---|---|---|---|
| चू, चे, चो, ला अश्वि० | हू, हे, हो, डा पुष्य. | रू, रे, रो, ता स्वाती | जू, जे, जो, खा अभि० |
| ली, लू, ले, लो भरणी | डी, डू, डे, डो, आश्ले० | ती, तू, ते, तो विशा० | खी, खू, खे, खो श्रवण. |
| आई, ऊ, ए० कृत्तिका | मा, मी, मू, मे मघा. | नानी, नू, ने अनुराधा | गा, गी, गू, गे धनिष्ठा |
| ओ, वा, वी, वू रोहि० | मो, टा, टी, टू पूर्वा | नो, या, यी, यू ज्येष्ठा. | गो, सा, सी, सू शततारका |
| वे, वो, का, की मृग. | टे, टो, पा, पी उत्तरा. | ये, यो, भा, भी मूळ. | से, सो, दा, दी पूर्वाभाद्रप. |
| कू, घ, ङ, छ आर्द्रा | पू, षा, णा, ठा हस्त. | भू, धा, फा, ढा, पूर्वाषाढा | दु, झा, आ, था उ० भाद्रप० |
| के, को, हा, ही पुनर्वसु | पे, पो, रा, री, चित्रा | भे, भो, जा, जी उ० षाढा | दे, दो, चा, ची रेवती |

मंचकारोहण शशितुरगधनिष्ठारेवतीपुष्यचित्राशतभि
षगनुराधात्र्युत्तरास्वातिहस्ताः॥ बुधगुरुभृगुवारेसौम्यलग्ने
ऽर्भकस्यनिगदितमिह पूर्वैर्मंचकारोहणंहि॥११॥

**अर्थ-** मृग. आश्विनी, धनिष्ठा, रेवती, पुष्य, चित्रा, शततारका, अनुराधा, ३ उत्तरा, स्वाती, हस्त या नक्षत्रांवर आणि शुक्र, बुध, गुरु हे वार व तूळ, वृश्चिक, कुंभ हीं लग्नें यांवर प्राक्शिर करून शिशूस प्रथम मंचकारोहण करावें शुभकारक होय.

पालकारोहणासशुभदिवस॥ ॥आंदोलाशयनंपुंसोद्वाद
शेदिवसेशुभं॥ त्रयोदशेतुकन्यायाननक्षत्रविचारणा॥१२॥

**अर्थ-** मुलास जन्मदिवसा पासून १२ वा दिवस आणि कन्येस १३ वा दिवस असे पाळण्यांत घालण्यास उक्त होत. नक्षत्र विचारणा करण्याची गरज नाहीं.

बृहस्पतिमतानेंदुग्धपानासमुहूर्त.

एकत्रिंशद्दिनेचैवपयःशंखेनपाययेत्॥ अन्नप्राशननक्ष
त्रदिवसोदयराशिषु॥१३॥

**अर्थ-** जन्म जाहल्या पासून ३१ वे दिवशीं जीं अन्नप्राशनोक्त नक्षत्रें आहेत त्यांवर शंखामध्यें दूध घेऊन प्रथमतः शिशूस पाजावें

तांबूलभक्षण सार्धमासद्वयेदद्यात्तांबूलंप्रथमंशिशोः॥
कर्पूरादिकसंमिश्रंविलासायहितायच॥१४॥मूलाद्र्याचित्रक.

रतिष्यहरींद्रभेषुपौष्णेतथामृगशिरोदितिवासवेषु ॥ अर्केंदु जीवभृगुबोधनवासरेषुतांबूलभक्षणविधिर्मुनिभिःप्रदिष्टः १५

**अर्थ-** जन्म जाहल्यापासून अडीच महिन्यानीं मूळ, हस्त, चित्रा, पुष्य, श्रवण, ज्येष्ठा, रेवती, मृग, पुनर्वसु, धनिष्ठा, हीं नक्षत्रें व रवि, सोम, गुरु, शुक्र, बुध हे वार यांवर शिशूस कर्पूरादिक पदार्थ मिश्रित करून प्रथम तांबूल द्यावा म्हणजे तो विलास कारक व हितकारक असा होतो.

**सूर्यावलोकन** हस्तःपुष्यपुनर्वसूहरियुगंमैत्रत्रयंरोहिणीरेवत्युत्तरफाल्गुनीमृगयुताषाढोत्तरास्वातिभे ॥ मासेतुर्यतृतीयकेशनिकुजौत्यक्त्वाचरिक्तांतिथिंसिंहादित्रयकुंभराशिसहितंनिष्कासनंशस्यते ॥ १६ ॥

**अर्थ-** हस्त, पुष्य, पुनर्वसु, श्रवण, धनिष्ठा, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, रोहिणी रेवती, उत्तरा फा०, मृग, उत्तराषाढा, स्वाती हीं नक्षत्रें व चवथा, तिसरा हे मास. आणि सिंह, कन्या, तूळ, कुंभ हीं लग्नें यांवर, शनि, भौम, हे वार व रिक्तातिथि वर्ज करून शुभदिनीं प्रथम शिशूस बाहेर नेऊन सूर्यावलोकन करवावें.

**कर्णवेध** रोहिण्युत्तरमूलमैत्रमृगभेविष्णुत्रयेऽर्कत्रयेरेवत्यांचपुनर्वसौहृयभगेकर्णस्यवेधःशुभः मीनेस्त्रीधनुमन्मथेषुचघटेवर्षेह्ययुग्मेतिथौसौम्येदेवगुरौरवौचशयनंत्यक्त्वाचविष्णोर्बुधैः ॥ १७ ॥

**अर्थ-** रोहिणी, ३ उत्तरा, मूळ, अनुराधा, मृग, श्रवण, धनिष्ठा, शततारका, रेवती, पुनर्वसु, पुष्य हीं नक्षत्रें आणि मीन, कन्या, धन, मिथुन, कुंभ हीं लग्नें व बुध, गुरु, रवि हे वार शुभ यांजवर युग्मतिथि, युग्मवर्ष, विष्णुशयन ( चातुर्मास्य ) व दक्षिणायन वर्ज करून शिशूचा कर्णवेध करावा.

**भूम्युपवेशन ( शिशूस भूमीवर घालणें )** पंचमेचतथामासिभूमौतमुपवेशयेत् ॥ तत्रसर्वेग्रहाःशस्ताभौमोप्यत्रविशेषतः ॥ १८ ॥ उत्तरात्रितयंसौम्यंपुष्यर्क्षंशक्रदैवतं ॥ प्राजापत्यंचहस्तश्चशस्तमाश्विनमित्रभं ॥ १९ ॥

**अर्थ-** पांचवे महिन्यांत रविवारादिक सकल वार शुभ त्यांत भौमवार विशेषें-करून घ्यावा आणि तीन उत्तरा, मृग, पुष्य, ज्येष्ठा, रोहिणी, हस्त, अश्विनी, अनुराधा हीं नक्षत्रें उक्त अशा दिवसीं मुलास भूमीवर उपवेशन करावें.

अन्नप्राशन पूर्वार्द्राभरणीभुजंगवरुणात्यक्त्वाकुजार्कीतथा नंदांपर्वचसप्तमीमपितथारिक्तामपिद्वादशीं ॥ षष्ठेमास्यथवा-न्नभक्षणविधिस्त्रीणामयुक्पंचमेगोकन्याझषमन्मथेबुधब-लेपक्षेचयोगेस्शुभे ॥२०॥

**अर्थ-** तीन पूर्वा, आर्द्रा, भरणी, आश्लेषा शततारका व भोम, शनि हे वार व नंदा, पर्वणी, रिक्ता, सप्तमी आणि द्वादशी इत्यादिक सकल अशुभ वर्ज करून ६ वे अथवा ८ वे महिन्यांत मुलास आणि ५ वे किंवा ७ वे अशा विषम मासीं कन्येस अन्न प्राशन उक्त. वृषभ, मिथुन, मकर, कन्या या लग्नीं बुध बल पाहून शुक्लपक्षीं शुभ योगीं अन्न भक्षण करवावें

चौल रेवत्याद्यकरत्रयादितिमृगज्येष्ठासुविष्णुत्रयेपुष्ये-चोत्तरगेरवौगुरुकवींदुज्ञेषुपक्षेसिते ॥ गोस्त्रीमन्मथचापकुंभ मकरंहित्वाचरिक्तातिथिं षष्ठींपर्वतथाष्टमीमपिसिनीवालींच-चूडाशुभा ॥ २१ ॥ जन्मतस्तृतीयेब्दे श्रेष्ठमिच्छंतिपंडिताः ॥ पंचमेसप्तमेवापिजन्मतोमध्यमंभवेत् ॥ २२ ॥.

**अर्थ-** रेवती, अश्विनी, हस्त, चित्रा, स्वाती, पुनर्वसू, मृग, ज्येष्ठा, श्रवण, धनिष्ठा शततारका, पुष्य व उदगयन व गुरु, शुक्र, सोम, बुध हे वार आणि शुक्लपक्ष हीं शुभ होत. वृषभ, कन्या, मिथुन, धन, कुंभ, मकर हीं लग्नें वर्ज करून शेष लग्नें शुभ होत. रिक्ता, षष्ठी, अष्टमी, पर्व (अमावास्यादि) अशा दुष्टतिथि वर्ज करून जन्म जाहल्या पासून तिसरे वर्षी चूडाकर्म श्रेष्ठ असें पंडित म्हणतात आणि पांचवें व सातवे वर्षी मध्यम होय.

विद्यारंभासमुहूर्त रेवत्यांमृगपंचकेहरियुगेपूर्वासुहस्त त्रयेमूलाश्विन्यभिजित्सुभानुभृगुजेसौम्येविधौवाक्पतौ ॥ अब्देपंचमकेविहायनिखिलानध्यायषष्ठीयुतारिक्ताःसौम्य-दिनेतथैवविबुधैःप्रोक्तोमुहूर्तःशुभः ॥२३॥

**अर्थ-** रेवती, मृग, आर्द्रा, पुनर्वसू, पुष्य, आश्लेषा, श्रवण, धनिष्ठा, हस्तादि-त्रय, ३ पूर्वा, मूळ, अश्विनी, अभिजित आणि रवि, बुध, शुक्र, गुरु, सोम हे वार आणि जन्मापासून पांचवें वर्ष शुभ होय. अनध्याय, षष्ठी, रिक्ता, पर्वादि तिथि व दुष्ट योगादि वर्ज करून उदगयनांत शुक्लपक्षीं आणि शुभ लग्नीं प्रथम विद्याभ्यासास आरंभ करावा.

मौंजीबंधनमुहूर्त ॥ पूर्वाषाढहरित्रयेचमृगभेहस्तत्रयेरेवतीज्येष्ठापुष्यभेगेषुचोत्तरगतेभानोचपक्षेसिते ॥गोमीनमृगदाधनुर्वनचरेशुक्रेर्कजीवेतिथौपंचम्यांदशमीत्रयेव्रतमहर्थेवद्विजन्मद्वये॥२४॥

**अर्थ-** पूर्वाषाढा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, अश्विनी, मृग, हस्त, चित्रा, स्वाती, रेवती, ज्येष्ठा, पुष्य, पूर्वा फा०, आणि उदगयन, शुक्लपक्ष, वृषभ, मीन, कन्या, धन, सिंह ही लग्नें आणि शुक्र, रवि, गुरु, सोम हे वार व पंचमी, दशमीत्रय (१०, ११, १२) आणि दिवस ही उक्त होत.

मासादिकमु० विप्रंवसंतेक्षितिपंनिदाघेवैश्यंघनांतेव्रतिनंविदध्यात् ॥ माघादिशुक्लांतिकपंचमासाःसाधारणावासकलद्विजानां॥२५॥

**अर्थ-** विप्रास वसंत, क्षत्रियास ग्रीष्म, वैश्यास शरद् असे वर्णपरत्वें व्रतबंधास ऋतु घ्यावे आणि माघादिक शुक्ल पंचमास साधारण्यें सकल द्विजांस उक्त होत.

मौंजीसउक्तकाल ॥ गर्भाष्टमेऽष्टमेवाब्दे पंचमेसप्तमेऽपि वा ॥ द्विजत्वंप्राप्नुयाद्विप्रोवर्षेत्वेकादशेनृपः ॥ २६ ॥

**अर्थ-** गर्भापासून अथवा जन्मापासून आठवें वर्ष अथवा पांचवें किंवा सातवें ब्राह्मणास उक्त आणि ११ वें वर्ष क्षत्रियास उक्त.

गुरुबल॥ ॥वर्णाधिपेबलोपेतेत्दुपनीतक्रियाहिता॥सर्वेषांचगुरोसूर्येचंद्रेचबलशालिनि॥२७॥

**अर्थ-** वर्णाधिपपरत्वें बल पहावें आणि सर्वांस गुरु, सूर्य, चंद्र यांचें बल पाहिजे.

गलग्रहतिथिवर्ज्य॥ ॥ त्रयोदश्यादिचत्वारिसप्तम्यादितिथित्रयं॥चतुर्थ्येकाकिनीप्रोक्ता अष्टावेवगलग्रहाः॥२८

**अर्थ-** त्रयोदश्यादि प्रतिपदांत तिथि ४ व सप्तम्यादि ३ आणि चतुर्थी ह्या आठ गलग्रह संज्ञ तिथि वर्जाव्या.

शूद्रादिकांस्संस्कारकरण्यासमुहूर्त॥ ॥ मूलार्द्राश्रवणद्विदैववसुभेपुष्येतथाचाश्विभेरेवत्यांमृगरोहिणीदितिकरेमैत्रेतथावारुणे॥चित्रास्वातिमथोत्तराभृगुसुतेभौमेतथान

चंद्रजेशूद्राणांतुबुधैः शुभंहिकथितंसंस्कारकर्मोत्तमं ॥ २९॥

**अर्थ-** मूळ, आर्द्रा, श्रवण, विशाखा, धनिष्ठा, पुष्य, अश्विनी, रेवती, मृग, रोहिणी, पुनर्वसु, हस्त, अनुराधा, शततारा, चित्रा, स्वाती, उत्तरात्रय, हीं नक्षत्रें आणि शुक्र, भौम, बुध हे वार शूद्र व अन्य संकर जातीय यांस संस्कार कर्मास उक्त होत.

## शूद्रांस संस्कार किती आहेत व- शूद्रकर्तव्य धर्म कोणते व कसे याविषयीं लिहितो.

गर्भाधान १ पुंसवन २ अनवलोभन ३ सीमंतोन्नयन ४ जातकर्म ५ नामकर्म ६ निष्क्रमण ७ अन्नप्राशन ८ चौल ९ विवाह १० हे दहा संस्कार शूद्रांस आहेत हे अमत्रक करावे व शूद्रकमलाकर ग्रंथामध्यें शूद्रांस पंचमहायज्ञ सांगितले आहेत. कोणी ग्रंथकार पुराणोक्त मंत्रेंकरून उपनयनही करावें असें ह्मणतात. ब्रह्म पुराणामध्यें शूद्रांस विवाह संस्कार मात्र सांगितला आहे त्याची व्यवस्था सदसच्छूद्र परत्वें करावी आणि शूद्रांनी ब्राह्मणाची सेवा करावी ही त्यांची वृत्ति होय आणि विपत्ति कालीं वाणिज्य, शिल्प व लवणादि विक्रय ही करावा. मद्य मांसादिकांचा विक्रय त्यांनी करूंनये. कपिला गाईचें दुग्धग्रहण, ब्राह्मण स्त्रीगमन आणि वेदाक्षरांचा विचार करणें हीं तीन कर्में शूद्रांनीं केलीं असतां त्यास चांडालत्व प्राप्त होतें. शूद्र चवथा वर्ण आहे ह्मणून धर्मास योग्य आहे व शूद्रांनीं वेद मंत्र, स्वाहाकार, स्वधाकार, वषट्कार यांवांचून अन्य पुराणोक्त मंत्र, व्रतादिकांचे ठायीं ब्राह्मणा कडून ह्मणवावा भारत, रामायण इत्यादि पुराण श्रवणाचा अधिकार शूद्रांस आहे परंतु पुराणिक यांनीं ब्राह्मणास सांगावें तें त्यांनीं ऐकावें व शूद्रांनीं पंच महायज्ञ व श्राद्धादिकर्म इत्यादिक कात्यायन सूत्राच्या आधारें करून करावीं असें मयूखवाक्य आहे. आगमामध्यें सांगितलेले विष्णु, शिव इत्यादिकांचे मंत्र नमोंत व प्रणवरहित असे त्यांनीं जपावे. पुराण श्रवणाचे निदिध्यासें करून ब्रह्म ज्ञान ही शूद्रांनीं संपादन करावें. उपनिषद्भाग शूद्रांनीं श्रवण करूंनयेत. त्यांस अधिकार नाहीं. शूद्रांनीं सर्व श्राद्धें आमान्न दानें करूनच करावीं. सर्व प्रजा कश्यपाच्याचआहेत ह्मणून शूद्रांस काश्यप गोत्र आहे.

तें श्राद्धांचे ठायींच ह्मणावें अन्यत्र ह्मणूंनये. या प्रकारें करून शूद्रांनीं शांतिकर्म, पूजा, प्रायश्चित्त ब्राह्मण द्वारें करावें. शूद्रांनीं मंत्रावांचून पार्थिव पू

जाही करावी. नवरात्रांत सप्तशतीचा जप व होम ब्राह्मण द्वारा करावा. शूद्रांला-स्त्रनः पौराणमंत्र पठनाविषयीं ही अधिकार नाहीं म्हणून " शूद्रः स्करव मवाप्नुयात " याठिकाणीं विष्णु सहस्र नामाच्या भाष्यांत शूद्रास श्रवणापासून फलप्राप्ति, नतु पठनेन यावरून शूद्रास गीता व विष्णु सहस्रनाम पठन करण्यास अधिकार नाहीं. क्वचित् पौराण मंत्रें करून पूजा करण्यास शूद्रासही अधिकार सांगितला आहे. गणेशसहस्रनामही स्त्री, शूद्र व पतित यांनीं पठन करावें. असें त्याच्या फलश्रुतींत आहे. जो ब्राह्मण शूद्राची दक्षिणा घेऊन वैदिक मंत्रानीं होम, अभिषेक, पूजा इत्यादिक करतो त्याचें पुण्य शूद्रास मिळतें परंतु तो ब्राह्मण मात्र महामत्स्य वाची होतो असें माधव ग्रंथांत सांगितलें आहे. शूद्रांनीं हिंसा करूंनये. सत्य भाषण करावें. पवित्र असावें. इंद्रिय निग्रह करावा. दान, शम, दम, क्षमा इत्यादि धर्म परलोक प्राप्तीचे आहेत ते आचरावे. शूद्रांच्या गर्भाधानादि दहा संस्कारांचे प्रयोग पुण्याहवाचनासुद्धां शूद्रकमलाकरामध्यें आहेत तेथून जाणावे.

शूद्रांच्यागर्भाधानादिकांसमु० ॥ ॥ जन्मर्क्षेभरणीमूलंदुष्टेंदुरेवतींमघां ॥ पर्वाहश्चव्यतीपातंवैधृतिंपरिघार्धकं ॥ ३० ॥ पित्रोःश्राद्धदिनंसंध्यांदिवाषष्ठींचपर्वच ॥ आर्तवाह्नचतुष्कंचरिक्तांरिक्ताकंसंक्रमान् ॥ ३१ ॥ तथैवक्रूरवारांश्चगर्भाधानेविवर्जयेत् ॥ स्वात्यांहस्तेनुराधायांरोहिण्यांवाश्रवत्रये ॥ ३२ ॥ त्र्युत्तरेमृगशीर्षेचशुभाहेसमराशिषु ॥ गर्भाधानंप्रशस्तंस्याच्छुस्तेचंद्रेशुभांशके ॥ ३३ ॥ केंद्रकोणस्थितेसौम्येपापेचत्रिषडायगे ॥ पुंलग्नेपुनवांशेच तथापुंग्रहवीक्षिते ॥ ३४ ॥ चित्रापुनर्वसौपुष्येअश्विन्यामध्यमस्मृतं ॥ एवंप्रोक्तेशुभेकालेगर्भाधानंतुपादजः तस्यपुत्रोभवेत्सम्यक्कीर्तिमान्जगतीतले ॥ ३५ ॥

**अर्थ**- जन्मनक्षत्र, भरणी, मूळ, चवथा, ८ वा, १२ वा असा चंद्र, रेवती, मघा, पूर्णिमा, अमावास्या, व्यतीपात, वैधृति, परिघाचें पूर्वार्ध, माता, पिता यांचें श्राद्धदिन, संध्याकाळ, दिवस, षष्ठी, अष्टमी, ऋतूचे प्रथम चार दिवस, कल्याणी, रिक्तातिथि, संक्रांति त्याज्य घटिका, पापवार, हे सर्व वर्ज करून स्वाती, हस्त, अनुराधा, रोहिणी, श्रवण, धनिष्ठा, शततारका, ३ उत्तरा, मृग, समराशि, शुभचंद्र, शुभग्रहाचा अंश, केंद्र (१, ४, ७, १०) कोण (९, ५) यास्थानीं शुभग्रह, -

३, ६, ११ या स्थानीं पापग्रह, पुरुष नवांश, पुरुषलग्न, पुरुषग्रहानें अवलोकित असे सर्व शुभयोग असतां जो शूद्र गर्भाधान करील त्यास भूतलाचे ठायीं उत्तम कीर्तिमान असा पुत्र होईल.

## पुंसवनासमुहूर्त.

द्वितीयेवातृतीयेवातुर्ये पुंसवनंस्मृतं॥ पुनर्वसुद्वयेमूलश्रवणे मृगहस्तयोः॥ ३६॥ गुरुभौमार्कवारेषुप्रोक्तंपुंसवनादिकं॥ मासेशेसबलेचंद्रेपुलग्नेपुरुषांशके॥ ३७॥ सौम्येकेंद्रत्रिकोणस्थेपापेलाभत्रिषट्कगे॥ ३८॥

**अर्थ-** २ रा, ३ रा, ४ था यामासीं; पुनर्वसु, पुष्य, मूळ, श्रवण, मृग, हस्त, या नक्षत्रांवर; गुरु, भौम, रवि यांचे वारीं; मासपतीचें बळ व चंद्रबळ असतां; पुरुषलग्नीं, पुरुषांश असतां; शुभग्रह केंद्र कोणीं व पापग्रह ३, ६, ११ यास्थानीं असता पुंसवनकर्म करावें. असें केलें तर तो गर्भ पुरुष संज्ञ उत्पन्न होतो

## अथ सीमंत कर्म.

हें ४ थे, ६ वे किंवा ८ वे मासीं पुंसवनोक्त मुहूर्तीं करावें

## अथजातकर्म

कुमारेजातेनालच्छेदनात्प्राक्पिताशीतोदकेनसचैलंस्नात्वा जातकर्मकुर्यात्॥ अथवानामकर्मणासहकुर्यात्॥

**अर्थ-** पुत्र जाहला असतां नालच्छेदनाच्या पूर्वीं पित्यानें शीतोदकस्नान करून जातकर्म करावें अथवा नाम कर्मासह करावें

## नामकर्मासमुहूर्त.

नामकर्म शूद्रांनीं जन्मापासून २२ वे किंवा ३२ वे दिवसीं करावें. उक्त दिवसीं अमावास्या, संक्रांति, व्यतीपातादि, दुष्टयोग, कल्या णीइत्यादि कांही त्याज्य असल्यास, पूर्वीं जातकर्मास सांगितलेल्या नक्षत्रांवर पुढें करावें.

## आंदोलाशयनासमु०

आंदोलाशयनंपुंसोद्वादशेदिवसेशुभं॥ त्रयोदशेतुकन्यायाननक्षत्रविचारणा॥ ३९॥

**अर्थ-** मुलास पाळण्यांत घालण्यास १२ वा दिवस आणि कन्येस १३ वा दिवस शुभ होय उक्तदिवसीं नक्षत्रविचारणा नकरावी.

**कर्णवेधासमु०** मासेषष्ठेसप्तमेवाऽष्टमेवावेध्यौकर्णौ-

द्वादशेषोडशेऽन्हि ॥ ४० ॥

**अर्थ-** ६ वा, ७ वा, ८ वा हे मास शुभ अथवा १२ वा किंवा १६ वा या दिवसीं मृग, आर्द्रा, हस्त, चित्रा, पुनर्वसु, पुष्य, श्रवण, धनिष्ठा, रेवती या नक्षत्रांवर, रिक्ता, पूर्णिमा, अमावास्या वर्ज करून शुभतिथीवर कर्ण वेध करावा.

निष्क्रमणमु० ॥ ॥ ३ रे किंवा ४ थे मासीं गमनास उक्त नक्षत्रीं करावें.

अन्नप्राशनमु० रेवतीद्वितयेपुष्येपुनर्वस्वनुराधयोः ॥
श्रवणादित्रयेहस्तत्रितयेरोहिणीमृगे ॥ ४१ ॥ उत्तरायाशुभे
लग्नेमीनमेषालिभिन्नगे ॥ षष्ठेवाप्यष्टमेमासिपुंसांस्त्रीणांतुपं
चमे ॥ सप्तमेमासिवाकार्यंनवान्नप्राशनंशुभं ॥ ४२ ॥

**अर्थ-** रेवती, अश्विनी, पुनर्वसु, पुष्य, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हस्त, चित्रा, स्वाती, रोहिणी, मृग, ३ उत्तरा यांवर; मीन, मेष, वृश्चिक या लग्ना वांचून अन्यलग्नीं; ६ वे किंवा ८ वे महिन्यांत मुलास आणि ५ वे किंवा ७ वे महिन्यांत कन्येस अन्नप्राशन शुभ होय. प्रतिपदा, ६, ११, १२, ८, ४, ९, १४ ह्या तिथि व रात्रि वर्जून, शुभग्रहांचा द्रेष्काण, अंश व वार असतां व पूर्णचंद्रलग्नीं असतां हा संस्कार करावा.

## अथ विवाहप्रकरण

अस्तोदय ॥ ॥ प्रागुद्गतः शिशुरहस्त्रितयंसितः स्यात्पश्चाद्द-
शाहमिहपंचदिनानिवृद्धः ॥ प्राक्पक्षमेवगदितोऽत्रवसिष्ठमु-
ख्यैर्जीवस्तुपक्षमपिवृद्धशिशुर्विवर्ज्यः ॥ १ ॥

**अर्थ-** पूर्वेस शुक्राचा उदय होतो तेव्हां तीन दिवस शिशुत्वाचे आणि अस्त होतो तेव्हां १५ दिवस वृद्धत्वाचे वर्जावे व पश्चिमेस उदय असेल तर ५ दिवस शिशुत्वाचे आणि १० दिवस वृद्धत्वाचे वर्जावे व गुरूचे अस्तोदयासही १५, पंधरा दिवस वर्जावे.

अस्तोदयांचेंलक्षण ॥ ॥ यमशरद्विमितेऽहनिवज्रिणोदि
शिद्विसप्तसितास्तमनंतथा ॥ गगनबाणयमैर्दिशिपश्चिमे-
नवदिनास्तमनंतुभृगोर्बुधैः ॥ २ ॥

**अर्थ-** २५२ वे दिवसीं शुक्राचा अस्त पूर्वेस होतो त्याचा उदय ७२ वे दिवसीं पश्चिमेस होतो आणि २५० वे दिवसीं पश्चिमेस अस्त होतो त्याचा उदय ९ वे दिवसीं पूर्वेस होतो असें पंडितांनीं जाणावें.

अस्तांतकर्मेवर्ज्य ॥ ॥ वापीकूपतडागयज्ञगमनंक्षौरंप्रतिष्ठा
व्रतविद्यामंदिरकर्णवेधनमहादानंगुरोःसेवनं ॥ तीर्थस्नानवि
वाहकाम्यहवनंमंत्रोपदेशंशुभंदूरेणैवजिजीविषुःपरिहरेदः
स्तेगुरौभार्गवे ॥ ३ ॥

अर्थ- विहीर, आड, तलाव, यज्ञ, गमन करणें, चौल, देव प्रतिष्ठा, मौंजी ; विद्या रंभ, नूतन गृहांत प्रवेश, मुलांचा कर्णवेध, महादानें, गुरुसेवा, तीर्थस्नान, विवाह, कामनिक होम, मंत्रोपदेश हीं कृत्यें ज्यांस वांचण्याची इच्छा असेल त्यांनीं गुरु शुक्रांचे अस्तांत वर्जावीं

विवाहासवर्ज्य नाषाढप्रभृतिचतुष्टयेविवाहोनोपौषेन
चमधुसंज्ञकेविधेयः ॥ नैवास्तंगतयोर्तिभार्गवेचजीवस्तूत्वेन
खलुतयोर्नबालभावे ॥ ४ ॥ गीर्वाणमंत्रिणिमृगेंद्रमधिष्ठितेन
मासेऽधिकेत्रिदिनसंस्पृशिनावमेच ॥ ५ ॥

अर्थ- आषाढापासून ४ मास आणि पौष ; चैत्र व गुरुशुक्रांचा अस्त, सिंहस्थ गुरु, अधिक मास व क्षयमास हे विवाहास वर्जावे.

मूलादिजन्मनक्षत्रांचेदोष मूलजाश्वशुरंहंतिव्याल
जाकुलटांगना ॥ विशाखजादेवरघ्नीज्येष्ठाजाज्येष्ठनाशिका ६

अर्थ- मूलनक्षत्रीं जनन झालेले कन्येचे गुण वाईट ; आश्लेषांवर झालेली जारिणी; विशाखांवर झालेली कनिष्ठदिरास मृत्युकारक आणि ज्येष्ठांची ज्येष्ठ दिरास नाशक असें जाणावें.

जन्मनक्षत्रादिवर्ज्य जन्मर्क्षेजन्मदिनेमासेजन्मसमासेशुभं
त्यजेत् ॥ ज्येष्ठमास्याद्यगर्भस्यशुक्लवस्त्रस्त्रियाअपि ॥
७ ॥ अज्येष्ठाकन्यकायत्रज्येष्ठपुत्रोवरोयदि ॥ व्यत्ययोवा
तयोस्तत्रज्येष्ठोमासःशुभप्रदः ॥ ८ ॥

अर्थ- जन्मनक्षत्र, जन्मदिवस, जन्ममास हीं सर्व शुभकर्मांस वर्जावीं. प्रथमगर्भास (ज्येष्ठ पुत्र किंवा ज्येष्ठ कन्या यांस) ज्येष्ठ मास शुभकर्मास वर्ज्य आहे व ज्येष्ठकन्येस शुभ्रवस्त्र वर्ज्य होय. कनिष्ठ कन्या आणि ज्येष्ठ वर अथवा ज्येष्ठ कन्या आणि कनिष्ठ वर असें असतां ज्येष्ठमास विवाहास शुभ होय

वर्षाचें प्रमाण.

गर्भाधानाज्जन्मतोवापंचमाब्दात्परंशुभं ॥ कुमारीवरदानंचमेखला

बंधनंतथा ॥ ९ ॥

अर्थ- गर्भ धारणा पासून अथवा जन्म जाहल्या पासून पांचवे वर्षा पुढें कन्येचें दान ( विवाह ) व पुत्राचें मौंजी बंधन उक्त होय.

गुरुचंद्र बळ स्त्रीणांगुरुबलंश्रेष्टंपुरुषाणांरवेर्बलं ॥ द्वयोश्चं द्रबलंश्रेष्ठमितिगर्गेणभाषितं ॥ १० ॥ ॥

अर्थ- स्त्रियांस गुरुबळ आणि पुरुषांस रवीचें बळ व दोघांसही चंद्रबळ श्रेष्ठ होय.

गुरूचें फल नष्टात्मजाधनवतीविधवाकुशीलापुत्रान्विताहतधवासुभगाविपुत्रा ॥ स्वामिप्रियाविगतपुत्रधवाध- नाढ्यावंध्याभवेत्सुरगुरोक्रमशोभिजन्म ॥ ११ ॥

अर्थ- कन्येस जन्मस्थ गुरु असतां विवाह केला तर मुलें मरतील, द्वितीय - असतां धनवती, तृतीय विधवा, चतुर्थ जारिणी, पंचम पुत्रान्विता, षष्ठ विधवा, सप्तम सौभाग्यवती, अष्टम अपुत्रा, नवम पतिप्रिया, दशम मृतप्रजा आणि वि धवा, एकादश धनवती, द्वादश वंध्या अशीं अनुक्रमें फलें जाणावीं.

गुरुअनुकूलकरण्याचाप्रकार ॥ ॥ जन्मत्रिदशमारिस्थः - पूजयाशुभदोगुरुः ॥ विवाहेचचतुर्थाष्टद्वादशस्थोमृतिप्रदः ॥ १२

अर्थ- जन्मस्थ तृतीय, षष्ठ आणि दशम या स्थानींचा गुरु नेष्ट परंतु पूजा केली असतां शुभ फल देतो. ४, ८, १२ या स्थानींचा मृति प्रद होय तो वर्ज करावा.

घटित पाहण्याचाक्रम.

वर्णोवश्यंतथातारायोनिर्ग्रहगणास्तथा ॥ भ- कूटंनाडिमैत्रीच इत्येताश्चाष्टमैत्रिकाः ॥ १३ ॥

अर्थ- वर्ण, वश्य, तारा, योनि, ग्रह, गण, भकूट, नाडी इत्यादिकांची मैत्रीक्रमें करून पहावी.

वर्णाचाश्लोक ॥ १ ॥ मीनालिकर्कटाविप्रानृपाःसिंहाजधन्विनः ॥ कन्यानक्रवृषावैश्याःशूद्रायुग्मतुलाघटाः ॥ १४ ॥ वश्य ॥ २ ॥ हित्वाचापघटकन्यकातुला मानवाअजवृषोचतुष्पदाः ॥ कर्कमीनमकराजलोद्भवाः केसरीवनचरालिकीटकाः १५ तारावल ॥ ३ ॥ कन्यर्क्षाद्वरभंयावत्कन्याभंवरभादपि ॥ गण येन्नवभिःशेषत्रीष्वद्रिभमसत्स्मृतं ॥ १६ ॥ योनि ॥ ४ ॥ अश्वो

गजश्छागसर्पौसर्पश्वानबिडालकाः॥ मेषोबिडालकश्चैवमूषको-
मूषकश्चगौः॥१७॥ महिषीचततोव्याघ्रोमहिषीव्याघ्रकक्रमा
त्॥ मृगोमृगस्तथाश्वाचकपिर्नकुलएवच॥१८॥ नकुलोवान
रःसिंहोतुरगोमृगराट्पशुः॥ अघोरेणक्रमेणैवअश्विन्यादि
भयोनयः॥१९॥ वैरयोनि॥ गोव्याघ्रंगजसिंहमश्वमहिषंश्वै
णंचबभ्रूरगंवैरंवानरमेषयोश्चसुमहत्तद्वद्बिडालोदुरं॥ लोका
नांव्यवहारतोन्यदपितज्ज्ञात्वाप्रयत्नादिदंदंपत्योर्नृपभृत्य-
योरपिसदावर्ज्यंशुभस्यार्थिभिः॥२०॥ ग्रहमैत्री॥५॥मे
षवृश्चिकयोर्भौमः शुक्रोवृषतुलाधिपः॥कन्यामिथुनयोः-
सौम्योगुरुस्तुधनमीनयोः॥२१॥ शनिर्नक्रस्यकुंभस्यकर्कस्यैवतु-
चंद्रमाः॥ सिंहस्याधिपतिः सूर्यः कथितागणकैः क्रमात्॥२२॥ गण॥६
अनुराधामृगोऽश्विस्तुश्रवणोऽदितिपुष्यकः॥स्वातीहस्तोरेवती
चनवदेवगणाःस्मृताः॥२३॥ पूर्वात्रयरोहिणीचउत्तरात्रयमे
वच॥आर्द्रातुभरणीचैवनवैतेमानुषागणाः॥२४॥ आश्लेषाश
तभिषमूलविशाखाकृत्तिकातथा॥ चित्राज्येष्ठाधनिष्ठाचनवैतेराक्ष
सागणाः॥२५॥ नाडी॥८॥ अंत्यनाडी॥ कृत्तिकारोहिणीस्वाती
मघाऽश्लेषाचरेवती॥श्रवणाश्चोत्तराषाढाविशाखात्वेकनाडिका॥
२६॥ मध्यनाडी॥पूर्वाफल्गुनिकाचित्राधनिष्ठाभरणीमृगाः
॥पूर्वाषाढानुराधाचपुष्योऽहिर्बुध्न्यमेवच॥२७॥ आद्यनाडी॥
पूर्वाभाद्रपदामूलज्येष्ठाहस्तपुनर्वसू॥अश्विन्यार्द्राशतभिषाचो
त्तरात्वेकनाडिका॥२८॥ ॥अश्विनीभरणीकृत्तिकापादंमेषः॥
कृत्तिकात्रयारोहिणीमृगशिरोर्धंवृषभः॥मृगशिरोर्धमार्द्रापुनर्व
सुत्रयंमिथुनः॥पुनर्वसोःपादंपुष्यआश्लेषांतंकर्कोटकः॥मघा
पूर्वाउत्तरापादंसिंहः॥उत्तरात्रयहस्ताचित्रार्धंकन्या॥चित्रार्धंस्वा
तीविशाखात्रयंतूला॥ विशाखापादअनुराधाज्येष्ठांतंवृश्चि
कः॥मूलपूर्वाषाढाउत्तराषाढापादधनुः॥उत्तराषाढात्रयंश्रवण
धनिष्ठार्धंमकरः॥धनिष्ठार्धशततारकापूर्वाभाद्रपदात्रयंकुं-
भः॥पूर्वाभाद्रपदापादउत्तराभाद्रपदारेवत्यंतंमीनः॥१२॥
अर्थ- चंद्र सवादोन नक्षत्रें एकराशि भोगतो या प्रमाणें क्रम जाणावा.

# पूर्वार्ध

## कोष्टक

### घटितमानराशिपरत्वें

| राशि | वर्ण | वश्य | स्वामी |
|---|---|---|---|
| मेष | क्षत्रि. | चतुष्प० | भौम |
| वृषभ | वैश्य | चतुष्प० | शुक्र |
| मिथुन | शूद्र | मानव | बुध. |
| कर्क | विप्र | जलच. | चंद्र |
| सिंह | क्षत्रिय | वनच. | रवि |
| कन्या | वैश्य. | मानव | बुध. |
| तूल | शूद्र | मानव | शुक्र |
| वृश्चि० | विप्र | कीटक् | भौम. |
| धन | क्षत्रि० | मानव | गुरु. |
| मकर | वैश्य. | जलच० | शनि |
| कुंभ | शूद्र | मानव | शनि |
| मीन | विप्र | जलच. | गुरु. |

### घटितमाननक्षत्रपरत्वें

| नक्षत्रें. | योनि | वैरयोनि | गण | नाडी |
|---|---|---|---|---|
| अश्विनी | अश्व | म्हैस | देव | आद्य. |
| भरणी | गज | सिंह | मनुष्य | मध्य |
| कृत्तिका | मेष | वानर | राक्षस | अंत्य. |
| रोहिणी | सर्प | मुंगुस | मनुष्य | अंत्य. |
| मृग | सर्प | मुंगुस | देव | मध्य. |
| आर्द्रा | श्वान | हरिण | मनुष्य | आद्य |
| पुनर्वसू | माजर | उंदीर | देव | आद्य |
| पुष्य | मेंढा | वानर | देव | मध्य. |
| आश्लेषा | माजर | उंदीर | राक्षस | अंत्य |
| मघा | उंदीर | माजर | राक्षस | अंत्य |
| पूर्वा | उंदीर | माजर | मनुष्य | मध्य |
| उत्तरा | गाय | व्याघ्र | मनुष्य | आद्य |
| हस्त | म्हैस | अश्व | देव | आद्य |
| चित्रा | व्याघ्र | गाय | राक्षस | मध्य. |
| स्वाती | टोणगा | अश्व | देव | अंत्य |
| विशाखा | व्याघ्र | गाय | राक्षस | अंत्य. |
| अनुराधा | हरण | श्वान | देव | मध्य |
| ज्येष्ठा | मृग | श्वान | राक्षस | आद्य |
| मूळ | श्वान | मृग | राक्षस | आद्य |
| पूर्वाषाढा | वानर | मेंढा | मनुष्य | मध्य |
| उत्तराषाढा | मुंगुस | सर्प | मनुष्य | अंत्य |
| अभिजित् | मुंगुस | सर्प | मनुष्य | अंत्य |
| श्रवण | वानर | मेंढा | देव | अंत्य |
| धनिष्ठा | सिंह | गज | राक्षस | मध्य |
| शततारा | अश्व | म्हैस | राक्षस | आद्य |
| पूर्वाभाद्र. | सिंह | गज | मनुष्य | आद्य |
| उत्तराभाद्र. | बैल | व्याघ्र | मनुष्य | मध्य |
| रेवती | गज | सिंह | देव | अंत्य. |

**ताराबळाचीटीप**॥ वधूनक्षत्रापासून वरनक्षत्र मोजावें आणि नवांनीं भागावें. शेष ३, ५ अथवा ७ असे उरले तर अशुभ, अन्य सर्वही शुभ होत. असेंच वरनक्षत्रापासून वधूनक्षत्रापावेतों मोजून पूर्ववत् प्रमाणें जाणावें

भकूट॥ ॥नवपंचक॥ ॥मीनालिभ्यांयुतेकीटेकुंभेमिथुनसंयुते॥मकरेकन्यकायुक्तेनकुर्यान्नवपंचके॥२९॥-

**अर्थ-** मीनापासून नवांचे अंतरानें वृश्चिक राश येते आणि वृश्चिकापासून मीनराश पांचवी येते, तसेंच कर्कमीनाशीं नवपंचक, वृश्चिकाशीं पांच, नव आणि कुंभ, मिथुन व मकर, कन्या ह्या दोन दोन नवपंचकाच्या वर्जाव्या.

मृत्युषडष्टक॥ मेषकन्यकयोरेवतुलामीनकयोस्तथा॥युग्मात्योस्तुबुधैर्ज्ञेयोमृत्युर्वैनक्रसिंहयोः॥कुंभकर्कटयोश्चैववृषकोदंडयोस्तथा॥३०॥

**अर्थ-** मेष आणि कन्या यांचें परस्परें ६ आणि ८ असें अंतर येतें; याचक्रमानें तूळ आणि मीनः मिथुन आणि वृश्चिक; मकर, सिंह, कुंभ, कर्क; धन, वृष ह्या दोन दोन राशींस मृत्युषडष्टक ह्मणतात तें वर्जावें

प्रीतिषडष्टक॥ ॥सिंहोमीनयुतश्चैवतुलावृषयुतस्तथा॥धनुः कर्कयुतश्चैवकुंभकन्यकयोस्तथा॥३१॥ नक्रस्यमिथुनेन-प्रीतिरजालीप्रीतिरुत्तमा॥३२॥

**अर्थ-** सिंह, मीन, तूळ, वृष, कुंभ, कन्या; मकर, मिथुन; मेष, वृश्चिक; धन, कर्क ह्या दोन, २ राशींनें प्रीतिषडष्टक हें शुभ.

द्विर्द्वादश॥ ॥मेषझषौवृषमिथुनौकर्कहरीतुलाकन्ये॥अलिधनुषीमकरकुंभावेतौद्विर्द्वादशेराशी॥३३॥

**अर्थ-** मेष, मीन; वृषभ, मिथुन; कर्क, सिंह, तूळ; कन्या; वृश्चिक, धन; मकर, कुंभ ह्या दोन २ राशींचें प्रीतिषडष्टक हें शुभ.

चतुर्थदशम, तृतीय एकादश आणि उभयसप्तम॥

चतुर्थदशमंचैवतृतीयेकादशंशुभं॥उभयोःसप्तमसाम्यमेकर्क्षंशुभमुच्यते ३४

**अर्थ-** वधूवरांचे राशींचें परस्परें चतुर्थ, दशम अथवा तृतीय एकादश आल्यास शुभ आणि उभयसप्तम समहोय व एकनक्षत्र असल्यास शुभ जाणावें

वश्यावश्ययोजणे॥ ॥सिंहंविनानृणांसर्वेवश्याभक्ष्याश्चतोयजाः॥सिंहस्यवश्यास्त्यक्त्वालिंसर्वेषांव्यावहारिकः ३५

**अर्थ-** सिंहावांचून मनुष्यास सर्वचतुष्पदादिक वश्य होत. आणि जलोद्भव भक्ष्य होत व सिंहास वृश्चिकावांचून सर्व वश्य होत. शेषराशींशीं भक्ष्याभक्ष्य-

वर्जुन वश्यावश्य व्यवहारवत् योजावें.

ग्रहांचेंशत्रुत्वसमत्वमित्रत्व॥ ॥शत्रूमंदसितौसमश्चशशि
जोमित्राणिशेषारवेस्तीक्ष्णांशुःहिमरश्मिजश्चसुहृदौशेषाः
समाःशीतगोः॥जीवेंदूष्णकराः कुजस्यसुहृदोज्ञोऽरिःसि
तार्किसमौमित्रेसूर्यसितौबुधस्याहिमगुःशत्रुःसमाश्चापरे॥
३६॥सूरेःसौम्यसितावरीरविसुतोमध्योऽपरेस्त्वन्यथासौम्या
र्किसुहृदौसमौकुजगुरूशुक्रस्यशेषावरी॥शुक्रज्ञौसुहृदौ
समःसुरगुरुःसौरस्यचान्येऽरयोयेप्रोक्ताःसुहृदस्त्रिको-
णभवनेतेऽमीमयाकीर्तिताः॥३७॥

कोष्टक

| नांवें | रवि | चंद्र | मंगळ | बुध | गुरु | शुक्र | शनि |
|---|---|---|---|---|---|---|---|
| शत्रु | शा. शु. | ० | बुध | चंद्र | बु शु | र चंद्र | र.चं मं. |
| सम | बुध | मं. गु. शु | शा. शु. | मं. गु. शा. | शा. | मं. गु. | गु. |
| मित्र | चं.म.गु | र बु. | गु. चं. र. | र शु. | र चं म | बु. शा | बु. शु |

गुणाचें मेलन मार्तंडावरून.

वर्णाचा गुण १

उभयतांचा एक वर्ण अथवा वरा
चा उच्च वर्ण असतां गुण १ अन्यथा

| | वराचे वर्ण | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | ब्राह्म० | क्षत्रि० | वैश्य | शूद्र |
| वधूचे वर्ण | ब्राह्मण | १ | ० | ० | ० |
| | क्षत्रिय | १ | १ | ० | ० |
| | वैश्य | १ | १ | १ | ० |
| | शूद्र | १ | १ | १ | १ |

वश्याचे गुण २.

वैरभक्ष्येगुणाभावो द्वयोः साम्येगुणद्वयं
॥वैश्यवैरेगुणश्चैको वशभक्ष्ये गुणार्धकं १

टी० शत्रु भक्ष्य गुण ०, एकजातीय गुण २ व
श्य वैर गुण १ व वश्य भक्ष्य गुण अर्धा

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| चतुष्पद | २ | ॥ | १ | ० | २ |
| मानव | ॥ | २ | ० | ० | ० |
| जलचर | १ | ० | २ | २ | २ |
| वनचर | ० | ० | २ | २ | ० |
| कीटक | १ | ० | १ | ० | २ |

तारांचे गुण ३.

एकतोलभ्यतेताराशुभाचेवाशुभान्यतः॥तदासार्धोगुणश्चैकता
राशुद्धौमिथस्त्रयः॥उभयोर्नशुभाताराततदाशून्यसमादिशत्॥३८

अर्थ- एकाची शुभ आणि एकाची अशुभ अशी तारा आली तर गुण दीड, दोघांची एकता
रा अथवा शुभ तारा आलीतर गुण ३ आणि उभयतांची अशुभ तारा आली तर गुण शून्य जाणा.

| तारा | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ३ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | ३ |
| २ | ३ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | ३ |
| ३ | १॥ | १। | ० | १॥ | ० | १॥ | ० | १॥ | १॥ |
| ४ | ३ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | ३ |
| ५ | १॥ | १॥ | ० | १॥ | ० | १॥ | ० | १॥ | १॥ |
| ६ | ३ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | ३ |
| ७ | १॥ | १॥ | ० | १॥ | ० | १॥ | ० | १॥ | १॥ |
| ८ | ३ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | ३ |
| ९ | ३ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | १॥ | ३ | ३ |

**योनीचे गुण** महावैरे च वैरे च स्वस्वभावे यथाक्रमं ॥ मैत्रे चैवातिमैत्रे च खेंदुद्विद्विचतुर्गुणाः ॥ ३९ ॥

**अर्थ** महावैराचे गुण ० उभय शत्रुत्वाचा गुण १ स्वभावाचे गुण २ उभय मित्रत्वाचे गुण ३ अतिमित्रत्वाचे गुण ४ व एकजातीय गुण ४ व्यवहारात्.

| | अश्व | गज | मेष | सर्प | श्वान | मांजर | मूषक | गाय | म्हैस | व्याघ्र | हरण | वानर | मुंगुस | सिंह |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| अश्व | ४ | २ | २ | ३ | २ | २ | २ | १ | ० | १ | ३ | ३ | २ | १ |
| गज | २ | ४ | ३ | ३ | २ | २ | २ | २ | ३ | १ | २ | ३ | २ | ० |
| मेष. | २ | ३ | ४ | २ | १ | २ | १ | ३ | ३ | १ | २ | ० | ३ | १ |
| सर्प | ३ | ३ | २ | ४ | २ | १ | १ | २ | १ | २ | २ | २ | ० | २ |
| स्वान. | २ | २ | १ | २ | ४ | २ | १ | २ | २ | १ | ० | २ | १ | १ |
| मांज. | २ | २ | २ | २ | २ | ४ | ० | २ | २ | २ | ३ | ३ | २ | १ |
| मूषक | २ | २ | १ | १ | १ | ० | ४ | २ | २ | २ | २ | २ | २ | १ |
| गाय | १ | २ | ३ | २ | २ | २ | २ | ४ | ३ | ० | ३ | २ | २ | १ |
| म्हैस | ० | ३ | ३ | २ | २ | २ | २ | ३ | ४ | १ | २ | २ | २ | ३ |
| व्याघ्र | १ | २ | १ | १ | १ | १ | २ | ० | १ | ४ | १ | १ | २ | २ |
| हर. | ३ | २ | २ | २ | ० | ३ | २ | ३ | २ | १ | ४ | २ | २ | २ |
| वानर | ३ | ३ | ० | २ | २ | ३ | २ | २ | २ | १ | २ | ४ | ३ | २ |
| मुंगु. | २ | ३ | ३ | ० | १ | २ | १ | २ | २ | २ | २ | ३ | ४ | २ |
| सिंह | १ | ० | १ | २ | १ | १ | १ | १ | ३ | २ | २ | २ | २ | ४ |

**ग्रहांचे गुण.**

उभयतांचा स्वामी १ असतां किंवा उभयतांची मैत्री असतां गुण ५ समशत्रुत्व गुण ॥ समभित्रत्व गुण ४ शत्रुमित्रत्व गु० १, समत्व गु० ३ आणि उभय शत्रुत्व गुण ० या प्रकारें जाणावें

| वधूचे | | वराचे | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | र | चं. | मं. | बु. | गु | शु | श |
| | र. | ५ | ५ | ५ | ३ | ५ | १ | ० |
| | चं. | ५ | ५ | ४ | १ | ४ | ॥। | ॥। |
| | मं. | ५ | ४ | ५ | ॥। | ५ | ३ | ॥। |
| | बु. | ३ | १ | ॥। | ५ | ॥। | ५ | ४ |
| | गु. | ५ | ४ | ५ | ॥। | ५ | ॥। | ३ |
| | शु. | ० | ॥। | ३ | ५ | ॥। | ५ | ५ |
| | श. | ० | ॥। | ॥। | ४ | ३ | ५ | ५ |

### गणाचे फल.

उभयतांच्या गण १ असतां त्याचे गुण ६. वर देवगणी व वधू मनुष्यगणी त्याचे गु० ६, यांचे विपरीत अ० गुण ५, वर राक्षस गणी, वधू देवग० अ० गु० १ अन्यथा ० जाणा०

| वधूचे | वराचे | | |
|---|---|---|---|
| | देव | मनुष्य | राक्षस |
| देव | ६ | ५ | १ |
| मनुष्य | ६ | ६ | ० |
| राक्षस | १ | ० | ६ |

### नाडीचे फल.

भिन्ननाडीचे गुण ८ व एकनाडीचे गुण शून्य जाणावे.

| वधूचे | वराचे. | | |
|---|---|---|---|
| | आद्य | मध्य | अंत्य |
| आद्य | ० | ८ | ८ |
| मध्य | ८ | ० | ८ |
| अंत्य | ८ | ८ | ० |

**सत्कूटाचे गुण ७ व असत्कूट**– एकराशि भिन्नचरण व भिन्न नक्षत्र यांचे गुण ७, सम सप्तम गुण ७, तृतीय एकादश गुण ७. चतुर्थ दशम यांचे गुण ७, भिन्नराशि एकनक्षत्र यांचे गुण ५. प्रीतिषडष्टक, द्विर्द्वादश आणि नवपंचक यांमध्यें वर दूरता योनिशत्रुत्व असतां भकूटाचे गुण ६ होत.

**असत्कूटाचेलक्षण**– जर योनिमैत्र व स्त्रीदूरत्व आहे तर षडष्टक, द्विर्द्वादश, नवपंचकादि दुष्ट कूटाचे गुण ४ जाणावे.

योनिमैत्र व स्त्रीदूरत्व यांतून एक आहे तर दुष्टकूटाचा गुण १ जाणावा. व उभयतांचें एकनक्षत्र व एकचरण असतां गुण शून्य जाणावा.

| | मेष | वृषभ | मिथु | कर्क | सिंह | कन्या | तूळ | वृश्चि० | धन | मकर | कुंभ | मीन. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| मेष | ७ | ० | ७ | ७ | ० | ० | ७ | ० | ० | ७ | ७ | ० |
| वृष | ७ | ७ | ० | ७ | ७ | ० | ० | ७ | ० | ० | ७ | ७ |
| मिथु. | ७ | ७ | ७ | ० | ७ | ७ | ० | ० | ७ | ० | ० | ७ |
| कर्क | ७ | ० | ७ | ७ | ० | ७ | ७ | ० | ० | ७ | ० | ० |
| सिंह | ० | ७ | ० | ७ | ७ | ० | ७ | ७ | ० | ० | ७ | ० |
| कन्या | ० | ० | ७ | ० | ७ | ७ | ० | ७ | ७ | ० | ० | ७ |
| तूळ | ७ | ० | ० | ७ | ० | ७ | ७ | ० | ७ | ७ | ७ | ० |
| वृश्चि | ० | ७ | ० | ० | ७ | ० | ७ | ७ | ० | ७ | ७ | ० |
| धन | ० | ० | ७ | ० | ० | ७ | ० | ७ | ७ | ० | ७ | ७ |
| मकर | ७ | ० | ० | ७ | ० | ० | ७ | ० | ७ | ७ | ० | ७ |
| कुंभ | ७ | ७ | ० | ० | ७ | ० | ० | ७ | ० | ७ | ७ | ० |
| मीन | ० | ७ | ७ | ० | ० | ७ | ० | ० | ७ | ० | ७ | ७ |

एवं गुणमेलनं अष्टादशगुणोत्तरं शुभं न्यूनंतु अशुभम्.

### वर्णादिकांचीं फलें.

चेत्स्याद्वर्णाधिकाकन्याभर्तातस्यानजीवति.

यदिजीवतिभर्तातुज्येष्ठपुत्रोविनश्यति ॥ ४० ॥

**अर्थ-** कन्येचा वर्ण श्रेष्ठ असला तर तिचा भर्ता नाश पावेल किंवा ज्येष्ठपुत्र नाश पावेल.

**वैरयोनीचें फल-** अश्व आणि म्हैस अशा वैरयोनी परस्परें वधूवरांच्या तशाच राजा व सेवक यांच्या शुभ इच्छकांनीं वर्जाव्या. व्यवहारवत्.

**गणाचें फल-** स्वगणाचोत्तमाप्रीतिर्मध्यमानरदेवयोः ॥ कलहोदेवदैत्यानांमृत्युर्मानवरक्षसां ॥ ४१ ॥

**अर्थ-** दोघांचा एक गण असतां उत्तम प्रीति; मनुष्य व देव यांची मध्यम; देव दैत्य यांचा कलह आणि मनुष्य व राक्षस असतां मृत्युप्रद असें जाणावें

**कूटफलमाह-** षष्ठाष्टमेऽपमृत्युःपंचमनवमेऽनपत्यताज्ञेया ॥ द्विर्द्वादशेनिर्धनताशेषेषुमध्यमतासेव्या ॥ ४२ ॥

**अर्थ-** उभयतांचें षडष्टक आल्यास मृत्युकारक आणि नवपंचक अनपत्यत्वकरणारें व द्विर्द्वादश निर्धनत्व करणारें शेष राहिलेलीं मध्यम तीं घ्यावीं.

**नाडीफलमाह-रत्नकोशे-** अग्रनाडीव्यधेभर्तामध्यनाडीव्यधेद्वयं ॥ पृष्ठनाडीव्यधेकन्याम्रियतेनात्रसंशयः ॥ ४३ ॥

**अर्थ-** दोघांची आद्यनाडी भर्त्यास वाईट, मध्यनाडी दोघांस वाईट आणि अंत्यनाडी कन्येस मृतिप्रद होय.

**मध्यनाडी-** जठरेनिर्धनत्वंचगर्भेमरणमेवच ॥ पृष्ठेदौर्भाग्यमाप्नोतितस्मात्तापरिवर्जयेत् ॥ ४४ ॥

**अर्थ-** दोघांची मध्यनाडी निर्धन आणि गर्भी असतां मृत्यु व अंत्यनाडी दौर्भाग्य कारक अशा वर्जाव्या.

**ज्योतिःप्रकाशेपार्श्वनाडी-** निर्धनंमध्यनाड्यांतुदंपत्योर्नैवपार्श्वयोः ॥ केचिदाहुःपृष्ठनाड्योर्ननिंद्येइतिलहृचः ॥ ४५ ॥

**अर्थ-** दोघांची मध्यनाडी निर्धन नव्हेच पार्श्वनाडी परंतु विवाहास पार्श्वनाडी निंदित नाहीं. अन्यमतें क्षत्रियादिकांस उक्त होय.

**असत्कूटाचें फल-** स्त्रीनक्षत्रापासून वरनक्षत्र जवळ असलें तर अशुभ आणि वरनक्षत्रापासून स्त्रीनक्षत्र दूर असलें तर शुभ आणि जर नक्षत्र एक अथवा स्वामी एक असतां शुभ.

आतां पुढें दोन पृष्ठांमध्यें वधूवरांचे गुण एकत्र पाहण्याचें कोष्टक लिहिलें आहे.

# पूर्वार्ध

| | | रा· | मे· | मे· | मे· | वृ | वृ· | वृ· | मि· | मि· | मि· | क | क | क | सिं | सिं | सिं | क· | क· |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | भा· | १ | १ | ।· | ।।।· | १ | ।।· | ।।· | १ | ।।।· | ।· | १ | १ | १ | १ | ।· | ।।।· | १ |
| रा. | भा | न· | अ· | भ· | कृ· | कृ· | रो· | मृ· | मृ· | आ | पु· | पु· | पु· | आ | म | पू | उ | उ | ह |
| मे· | १ | अ· | ३६ | ३३ | ३२ | २४ | २१ | २२ | २७ | २८ | १९ | २३॥ | ३१॥ | २८ | २७॥ | २१॥ | ३२ | ११ | १२ |
| मे· | १ | भ· | ३४ | ३६ | ३४ | ३१ | २३॥ | १४॥ | १९ | २६ | २७ | ३१॥ | ३३॥ | २५॥ | ३२॥ | २४॥ | ३२॥ | २१॥ | २० |
| मे· | ।· | कृ· | ३२॥ | ३२ | ३६ | ३३ | १० | १६॥ | २० | २२ | २१ | २५ | २३॥ | २३॥ | २३ | २६॥ | २६॥ | १५॥ | १५॥ |
| वृ· | ।।।· | कृ· | १८॥ | १८॥ | ३६ | ३६ | ३४ | ३२॥ | २५॥ | २५॥ | २५॥ | २२ | २४ | २० | १८ | २१॥ | ३१॥ | २८ | २८ |
| वृ· | १ | रो | २३॥ | २४॥ | १३ | ३४ | ३६ | ३४॥ | ३५॥ | ३२ | २९ | २६ | १८ | १२ | १० | २४ | २७॥ | ३४ | ३४ |
| वृ· | ।।· | मृ· | २४ | ११ | ११॥ | ३२॥ | ३६ | ३६ | ३५ | ३३ | २९॥ | २६ | २० | २१ | १८ | १५ | २५ | ३१ | ३४ |
| मि· | ।।· | मृ· | २८ | २९ | २३॥ | २७॥ | ३५ | ३६ | ३५ | ३४ | ३१ | २०॥ | १३॥ | १३॥ | २२॥ | १८ | २९॥ | ३१॥ | ३२॥ |
| मि· | १ | आ· | २० | १८ | २३ | ३३॥ | ३२॥ | ३४ | ३३ | ३४ | ३४ | २३ | २३॥ | १५॥ | २३॥ | १९ | २१ | २४ | २४ |
| मि | ।।।· | पु· | ३० | २७॥ | २३ | २७॥ | ३०॥ | ३१॥ | ३०॥ | ३४ | ३४ | ३४ | २३ | १६॥ | २१॥ | २५॥ | २०॥ | २३ | २४॥ |
| क· | ।· | पु· | २३॥ | २१॥ | २५॥ | २२ | २५ | २६ | ३०॥ | १३ | ३३ | ३४ | ३४ | ३२॥ | २२ | २६ | २२ | १८॥ | १८॥ |
| क | १ | पु | ३० | २४ | २७ | २४ | २१ | १९ | १३॥ | २४ | २३ | ३४ | ३६ | ३४ | २५ | २१ | ३० | १६॥ | २६॥ |
| क | १ | आ | २६ | २६ | २२॥ | १३ | १२ | २० | १४॥ | १५॥ | १५॥ | ३२ | ३४ | ३४ | २०॥ | २१ | १४ | २१॥ | २०॥ |
| सिं· | १ | म· | २२ | २८॥ | ३१ | १७ | १० | १८ | २१॥ | २२॥ | २०॥ | २२ | २५ | २२॥ | ३६ | ३६ | ३२ | १८॥ | १५॥ |
| सिं | १ | पू | २६ | २४॥ | ३२॥ | २० | २४ | १६ | ११॥ | २८ | २६॥ | २१ | २३ | ११ | ३६ | ३६ | ३४ | ३० | २१॥ |
| सिं· | ।· | उ· | १७ | ३२ | ३२ | २० | २६ | २५ | २८ | २०॥ | २०॥ | २३ | ३१ | ३१ | ३२ | ३४ | ३६ | ३३ | १५ |
| क· | ।।।· | उ | १३ | ३२ | १६ | ३४ | ३४ | ३२॥ | ३१॥ | २३॥ | २३॥ | २० | २८ | २३॥ | २३॥ | ३१ | ३४ | ३५ | ३५ |
| क | १ | ह | १३ | २० | २७॥ | २८ | ३३ | ३४ | ३३ | ३२॥ | २३॥ | २०॥ | २८॥ | २३॥ | २४॥ | २८॥ | २० | ३५ | ३६ |
| क· | ।।· | चि· | १४ | ७ | २० | ३१ | २८ | २० | १९ | २६ | २४॥ | २३॥ | १३॥ | २७॥ | २१॥ | १५॥ | १४॥ | ३०॥ | ३३ |
| तु· | ।।· | चि· | २३॥ | १६ | १९॥ | २४॥ | २१ | १३ | २० | २७ | ३५॥ | २२ | १३ | २७ | २५ | ११॥ | १७॥ | १८॥ | ३४ |
| तु· | १ | स्वा | ३०॥ | २९॥ | १७॥ | १२॥ | १५॥ | २७ | ३४ | ३३ | ३४॥ | २२॥ | २८ | १५ | १२॥ | २४॥ | २५॥ | २६॥ | ३४ |
| तु· | ।।।· | वि· | २२॥ | २४॥ | २१॥ | १६॥ | ११॥ | ९॥ | ३५॥ | २७॥ | २१ | २२॥ | २२॥ | १९॥ | १७॥ | १९॥ | १७॥ | १८॥ | २५॥ |
| वृ· | ।· | वि· | १७॥ | २५॥ | १५॥ | २० | १५ | २३ | १३ | १३॥ | १२॥ | २० | २० | ११॥ | ११॥ | २३॥ | १४॥ | १८॥ | १९ |
| वृ· | १ | अ | २४॥ | १९॥ | १९॥ | २४॥ | २८॥ | २१॥ | ११ | १६ | ५०॥ | १७ | १९ | २१ | २४ | २० | २८ | २५ | २० |
| वृ· | १ | ज्ये· | १२ | १९॥ | २४॥ | २१॥ | २३॥ | २३॥ | १३ | ३ | ५ | ११॥ | २१ | २६ | २३ | २०॥ | १५॥ | १२ | १२ |
| ध· | १ | मू | २८ | २८ | ३३ | २० | १४ | १४ | २१ | १३ | १३ | १०॥ | १९॥ | २६ | ३२॥ | २६॥ | १७ | १६॥ | १३ |
| ध· | १ | पू | ३४ | २६ | ३४॥ | १५ | २० | १२ | १९ | २७ | २७ | २४॥ | १६॥ | २८॥ | ३२॥ | ३४॥ | ३२ | ३२॥ | २० |
| ध· | ।· | उ· | ३२ | ३३ | ३४ | १६ | ११॥ | १८ | २४ | २७ | २७ | २४॥ | २४॥ | १०॥ | २३ | ३२॥ | ३२॥ | १२ | १८॥ |
| म· | ।।।· | उ· | २८ | २८॥ | १५॥ | २६ | २३ | २१॥ | २१॥ | २३॥ | २३॥ | २८ | २८ | १४ | १६ | २०॥ | २०॥ | २७ | २७ |
| म· | १ | श्र· | २८ | २७ | २५ | २१ | २१ | २४ | २५ | २२॥ | २३॥ | २८ | २८ | १५ | १३ | १८ | १९॥ | २६ | २७ |
| म· | ।।· | ध· | २१ | १२ | २६ | ३१ | २८ | २० | ११ | १८ | १६॥ | २० | १२ | २६ | २६ | १५ | १२ | १८॥ | २० |
| कुं· | ।।· | ध· | २१ | १२ | २६ | ३१॥ | २८ | २० | १२ | १९ | १७॥ | १४ | १६ | २० | २५ | ११॥ | १८॥ | १४॥ | २९ |
| कुं· | १ | श | १६ | २२ | २८ | २२॥ | २६॥ | २८ | २० | १२ | १२ | ८॥ | १५ | २१ | २५॥ | १९॥ | ११॥ | ७॥ | १०॥ |
| कुं· | ।।। | पू | १९ | २६ | २० | ३४ | ३२॥ | ३२॥ | २४॥ | १७ | १७ | १३॥ | २१॥ | १४ | १९॥ | २५॥ | १६॥ | १२॥ | १५ |
| मी· | ।· | पू· | २१॥ | २१॥ | २३॥ | ३३॥ | २७ | २७ | २७ | २७ | १८ | १७ | २६ | ७॥ | ३० | २३ | १४ | १८॥ | १८ |
| मी· | १ | उ· | ३१॥ | २३॥ | ३१॥ | ३१॥ | २७ | १९ | १९ | २७ | २८ | २६ | १९ | २० | ३० | १५॥ | २५ | १९ | २८ |
| मी· | १ | रे· | ३२ | ३० | १८॥ | १८॥ | १८ | २५ | २७ | २६ | २६॥ | २८॥ | २३ | १३ | १८॥ | २२ | २२ | २६ | २७ |

| फ | तू. | तू. | तू. | वृ. | वृ. | वृ. | ध. | ध. | ध. | म. | म. | म. | कुं | कुं | कुं | मी. | मी. | मी. | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ·॥· | ·॥· | १ | ·।॥· | ·।· | १ | १ | १ | १ | ·।· | ·।॥ | १ | ·॥· | ·॥· | १ | ·।॥· | ·।· | १ | १ | |
| चि | चि | स्वा | वि | वि | अ | ज्ये | मू | पू | उ | उ | श्र | ध | ध | श | पू | पू | उ | रे | |
| २४ | २२॥ | २९ | २३॥ | १९॥ | २४ | १५ | २१ | ३३ | ३१ | ३६ | २७ | २१ | २१ | १६ | १० | २२ | ३१ | ३४ | १ |
| ५ | १३॥ | १९॥ | २२॥ | १८॥ | १५॥ | १९॥ | ३४ | २६ | ३४ | २८॥ | २७॥ | ११ | ११ | २७ | २५ | ३०॥ | २४ | ३२ | २ |
| १९॥ | २७॥ | १५॥ | १९॥ | १६॥ | १८॥ | २५॥ | ३३॥ | २८ | २० | १४॥ | २४ | २५ | २६ | २७ | १० | २५॥ | २६॥ | १०॥ | ३ |
| २८ | २० | ७॥ | १२॥ | २०॥ | १६॥ | ३०॥ | २२॥ | २३॥ | ९॥ | १४ | २०॥ | ३१॥ | ३०॥ | ३१॥ | २४॥ | २१॥ | २१॥ | १४ | ४ |
| ३४ | १७ | १३॥ | ६॥ | १४ | २९॥ | २४॥ | १५ | ३१ | १२॥ | १८ | २६ | ३४॥ | ३३ | ३१॥ | ३१ | २८ | २८ | ३० | ५ |
| २१ | १० | २३ | १५॥ | २३॥ | २१॥ | २५॥ | १६ | १२ | १८ | २३॥ | ३४ | २१ | २० | २८ | २०॥ | २७ | २९ | २८ | ६ |
| २१ | २१ | ३४ | ३४॥ | २४ | ११ | १५॥ | २३ | १९ | १८ | २१॥ | २६ | १३ | १४ | २९ | २४॥ | २७ | २९ | २८ | ७ |
| ३४ | ३४ | ३४ | ३४ | २१॥ | १७ | ४ | १४ | २८ | २८ | २४॥ | २९ | १९ | २० | १३ | ८ | २०॥ | २८ | २८ | ८ |
| २७॥ | २७॥ | ३४ | २९ | १६॥ | २१॥ | ७ | १५ | २७ | २७ | २३॥ | २४॥ | १८ | १९॥ | १४ | १० | १९ | २८ | २८ | ९ |
| २२॥ | २२ | २८ | २३ | २१ | २६ | ११॥ | १०॥ | २३॥ | २६ | २६ | २७ | २१ | १४ | ८॥ | ११॥ | २० | ३६ | २५ | १० |
| १२॥ | १२ | १७ | २२॥ | २१ | १८ | ११ | १९॥ | १४॥ | २२॥ | २६ | २७ | २३ | ६ | १५ | १०॥ | ८ | १८ | २७ | ११ |
| २७॥ | २७ | ६ | १० | १६॥ | २० | २६ | २५ | १७॥ | ९॥ | २३ | २३ | २६ | ९ | २० | १३ | २४ | ३१ | १३ | १२ |
| २८॥ | २४॥ | १० | १९ | ३२॥ | २४॥ | ३२ | ३२॥ | १६॥ | १७ | ४ | ४ | १९ | २४॥ | २४॥ | १८ | १८ | १८ | ११॥ | १३ |
| १४ | १६॥ | २४॥ | १८॥ | २४॥ | २२॥ | ३०॥ | ३२॥ | २४॥ | ३२॥ | १९॥ | १८ | ५ | ९॥ | १८॥ | २४॥ | २४ | १६ | २४ | १४ |
| १९॥ | १५॥ | २५॥ | १५ | २१॥ | ३०॥ | २२॥ | २३ | ३२॥ | ३२॥ | १९॥ | १९ | १२ | १६॥ | १०॥ | १०॥ | १५ | २६ | २४ | १५ |
| ३० | २०॥ | ३०॥ | २२॥ | १८ | २७ | १३ | २४ | २९॥ | २९॥ | २६ | २६ | १८ | १६ | ९॥ | ११ | १८ | ३० | २८ | १६ |
| ३३ | २६ | ३२॥ | २४॥ | २० | २७ | १४ | १५ | २७ | २६॥ | २५ | २६ | ३१ | १७ | १०॥ | १३ | १८ | ३० | २८ | १७ |
| ३४ | ३३ | २६ | ३०॥ | २४ | ११ | २५ | २६ | १२ | १२ | १८॥ | १९ | १८ | १९ | २२॥ | १७ | २० | १२ | २२ | १८ |
| ३४ | ३४ | ३२॥ | ३२॥ | ३२॥ | ७॥ | ११॥ | २१ | १२ | २२ | २६॥ | २६ | २४ | २४ | ३०॥ | २६ | २४ | ५ | ५ | १९ |
| २८ | ३३ | ३६ | ३३ | २३ | २०॥ | २७॥ | २३ | २७ | १८ | २३॥ | २४ | २७ | २७ | २८ | ३४ | २० | २१ | १३ | २० |
| ३२॥ | ३२॥ | ३३ | ३४ | २६ | १७॥ | २१॥ | २६ | २० | १४ | १८ | १६॥ | ३० | ३० | ३१ | २० | १५॥ | १४॥ | ७ | २१ |
| २६ | १९॥ | २६॥ | २६ | ३२ | ३३ | ३१॥ | २८॥ | २३ | १७॥ | १३ | १५॥ | २४॥ | २४॥ | २५॥ | ११॥ | २६ | १५ | १९॥ | २२ |
| १२ | ८ | ३२ | १८ | ३३ | ३६ | ३६ | २४॥ | ३२॥ | ३०॥ | २६ | ३१ | १६ | ११ | २१ | २४॥ | ३१ | २५ | ३४ | २३ |
| २५ | २१॥ | १६॥ | २१॥ | २१॥ | ३६ | २६ | २२ | २५ | २५ | २१॥ | २५॥ | २९॥ | २४॥ | २६ | १०॥ | १६॥ | १८ | २८ | २४ |
| २७ | २७ | २६ | २७ | ३२॥ | १४॥ | २४ | ३४ | ३५ | ३२॥ | २२॥ | २६॥ | ३०॥ | २७ | २०॥ | १३॥ | १६ | २६ | २८ | २५ |
| १२ | १८ | १९ | २६ | ३१॥ | १४॥ | ३२॥ | ३४ | ३६ | ३४ | २४ | ३४ | १६॥ | १३॥ | २३॥ | २७ | ३०॥ | १७॥ | ३२॥ | २६ |
| २१ | २७ | १९ | १९ | २३॥ | २२ | ३२॥ | ३२॥ | २४ | ३६ | ३५ | २६ | ३२॥ | ३३ | २२॥ | २९॥ | ३२ | ३२ | २४ | २७ |
| १७ | ३१॥ | ३१॥ | २३॥ | २२॥ | २७॥ | २२ | २८॥ | २५ | ३३ | ३६ | ३४ | ३२ | ३१॥ | १८॥ | ३१॥ | ३० | ३० | २२ | २८ |
| ३० | २७ | २२॥ | १७॥ | १४ | २७ | २३ | १९॥ | २८ | २७ | ३४ | ३६ | ३३ | ३६ | १९॥ | २९॥ | २७॥ | २९॥ | २२॥ | २९ |
| १७ | २४ | २९ | ३०॥ | १७ | १३ | २७ | २४॥ | ९॥ | १८ | ३२ | २७ | ३४ | ३२ | २५ | २५ | २४ | १४ | २२॥ | ३० |
| १७ | २५ | २७ | ३१॥ | २६ | १२ | २६ | २२॥ | १५॥ | २४॥ | २६॥ | २९ | ३१ | ३४ | ३३ | ३२॥ | १७॥ | ८ | १५॥ | ३१ |
| २५ | २३ | २८ | २३ | १७ | २१ | १९ | ३२॥ | २४ | २४ | २६ | १८॥ | २५ | ३३॥ | ३६ | ३२ | १८ | १०॥ | २७॥ | ३२ |
| १७॥ | ३१ | ३३ | ३३ | २७॥ | २७॥ | ३४ | १६॥ | १९॥ | ३०॥ | ३२॥ | २३॥ | १८॥ | ३२॥ | ३३ | ३४ | ३४ | ३४ | २१॥ | ३३ |
| २० | १३ | २०॥ | १४॥ | २७ | २६ | १३ | २३॥ | ३०॥ | ३१ | २९॥ | ३५॥ | ३१ | १७॥ | १० | १०॥ | ३४ | ३३ | ३०॥ | ३४ |
| ११ | ५ | २१ | १३॥ | २६ | १९ | ३४ | ३१॥ | २३॥ | ११॥ | २१॥ | २१॥ | १२ | ८॥ | १७॥ | २० | ३३ | ३६ | ३४ | ३५ |
| २२ | १८ | १२ | ८ | १८॥ | २७ | २९ | २८ | ३० | २२॥ | २१॥ | २३॥ | १९॥ | १५॥ | १७॥ | २०॥ | ३०॥ | ३४ | ३४ | ३६ |

राजमार्तंडांत दुष्टकूटाचीं दानें.

षडष्टके गोमिथुनं प्रदद्यात्कांस्यं सरूप्यं नवपंचमे च ॥ नाड्यां सुधेन्वन्नसुवर्णवस्त्रं द्विर्द्वादशे ब्राह्मणतर्पणं च ॥ ४६ ॥

**अर्थ-** अतिसंकट विवाहीं वधूवरांचे दुष्टकूटादिकांचीं दानें षडष्टकीं दोन गायी, नवपंचकीं कांस्यपात्र आणि रुपें, एकनाडीस गाय, अन्न, सुवर्ण, वस्त्र आणि द्विर्द्वादशास विप्रसंतर्पण अशीं दानें केलीं असतां दुष्टकूटादिकांचे दोष जातात.

ज्या वर्णास योनि पाहण्यास उक्त नाहीं त्यास जातक पहावें तो प्रकार वास्तुप्रकरणीं कथिला आहे.

विवाहास उक्त नक्षत्रें.

मूलमैत्रकरस्वातीमघापौष्णाध्रुवेंदवैः ॥ एतैर्निर्दोषभैः स्त्रीणां विवाहः शुभदः स्मृतः ४७

**अर्थ-** मूळ, अनुराधा, हस्त, स्वाती, मघा, रेवती, रोहिणी, तीन्ही उत्तरा, मृग, हीं निर्दोष नक्षत्रें विवाहास शुभ होत.

एकविंशतिमहादोष

पंचांगशुद्धिरहितो दोषस्त्वाद्यः प्रकीर्तितः ॥ उदयास्तशुद्धिरहितो द्वितीयः सूर्यसंक्रमः ॥ ४८ ॥ तृतीयः पापषड्वर्गो भृगुः षष्ठः कुजोऽष्टमः ॥ गंडांतकर्तरीरिःफषडष्टेंदुश्च संग्रहः ॥ ४९ ॥ दंपत्योरष्टमलग्नं राशेर्विषघटी तथा ॥ दुर्मुहूर्तो वारदोषः खार्जूरिकसमांघ्रिभं ॥ ५० ॥ ग्रहणोत्पातभं क्रूरविद्धर्क्षं क्रूरसंयुतं ॥ कुनवांशो महापातो वैधृतिश्चैकविंशतिः ॥ ५१ ॥

**अर्थ-** पंच्यागशुद्धिराहित्य हा प्रथम दोष १ उदयास्तशुद्धीचा अभाव २ सूर्यसंक्रांति ३ पापग्रहांचा वर्ग ४ लग्नापासून षष्ठस्थानीं शुक्र ५ लग्नापासून ८ वा मंगळ ६ गंडांत ७ कर्तरी ८ षष्ठ, अष्टम व द्वादश या स्थानीं सग्रह चंद्र ९ वधूवरांचे राशीपासून आठवें लग्न १० विषघटी ११ दुर्मुहूर्त १२ वारदोष ( यामार्धादिक ) १३ लत्ता १४ ग्रहणनक्षत्र १५ उत्पातनक्षत्र १६ पापग्रहविद्धन० १७ पापग्रहयुक्त नक्षत्र १८ पापनवांश १९ महापात २० आणि वैधृति २१ या प्रमाणें एकवीस महादोष जाणावे.

दोषलक्षणमाह.

कर्तरी॥ ॥लग्नाच्चंद्राद्व्ययर्धिस्थौपापखेटौयदातदा॥क र्तरीवर्जनीयासाविवाहोपनयादिषु॥५२॥नहिकर्तरिजोदो- षःसौम्ययोर्यदिजायते॥शुभग्रहयुतलग्नं क्रूरयोर्नास्तिकर्तरी ५३

**अर्थ-** लग्न आणि चंद्र यापासून १२ आणि २ या स्थानीं पापग्रह असतां क- र्तरी दोष होतो तो विवाहास आणि उपनयनास वर्जावा. कर्तरी दोष भंग ल क्षण. वर सांगितलेल्या स्थानीं सौम्यग्रह असले तर अथवा शुभग्रह युक्त. लग्न असलें तर शुभ म्हणजे त्यास्थानीं क्रूरग्रह असतांही कर्तरी दोष नाहीं.

## वधूवरांचेराशीपासून आठवें लग्न.

वरवध्वोर्बटोश्चापिजन्मराशेश्चलग्नतः॥त्याज्यमष्टमल ग्नंस्याद्विवाहव्रतबंधयोः॥५४॥

**अर्थ-** वर आणि वधू व बटु यांचे जन्मराशिपासून आणि जन्मलग्नापा सून अष्टमलग्न विवाहास व उपनयनास वर्जावें.

## दुष्टमुहूर्तकथन.

तिथ्यंशोदिनमानस्यरात्रिमानस्यचैवहि॥मुहूर्तःकथित स्तेषुदुर्मुहूर्तेशुभेत्यजेत्॥५५॥

**अर्थ-** दिनमान व रात्रिमान यांचा जो १५ अंश तो मुहूर्त होय, त्यांत शुक्र, चंद्र, गुरु, व शनि यावारीं दिवसा क्रमानें ९ वा, ९ वा, १२ वा आणि १ ला व मंगळ वारीं रात्रीं ७ वा मुहूर्त हे दुर्मुहूर्त होत यांवर शुभ कर्म करूं नये.

यामार्धादिकथन॥ ॥सूर्याद्यामदलंदिवैवनिगमाद्यश्वी षुनागत्रिषट्संख्यांकंकुलिकंदिवेंद्ररधिदिङ्नागर्तुवेदाद्रि कं॥व्येकंतन्निशिषोडशांशमपरेतिथ्यंशमुज्झंतितेःकालकं टकमेभिघंटममरेज्यज्ञास्फुजिभ्द्यः क्रमात्॥५६॥

**अर्थ-** दिवा रविवारापासून यामार्ध ( प्रहरार्ध ) कोष्टकांत अंक आहेत आ णि प्रवृत्ति निवृत्तींचे अंक आहेत ते यथानुक्रमें जाणावे व ते शुभकर्मास व र्जावे. दिवा रविवारा पासून दिनमानाचा षोडशांश कुलिक कोष्टकांत अंक - आहेत ते कुलिक संज्ञक होत ते शुभकर्मास वर्जावे. रात्रौ एकेकन्यून करा- वा. केचिन्मते दिनमानाचा पंचदशांश वर्ज्य करावा. गुरुवारापासून कालदोष, बुधवारापासून कंटक आणि शुक्रवारापासून यमघंट हे सर्व यथाक्रमें करू न वर्जावे. कुलिकवत्.

## कोष्टक

| वार रव्यादि | ॐ यामार्धघटि ४ संख्या | प्रवृत्ति | निवृत्ति | कुलिक घटी२ | काळ घटी२ | कंटक घटी२ | यमघंट घटी२ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| रवि | ४ था. | १२ | १६ | १४ वा | ८ वा | ६ वा | १० वा |
| चंद्र | ७ वा | २४ | २८ | १२ वा | ६ वा | ४ था | ८ वा |
| मंगळ | २ रा. | ४ | ८ | १० वा | ४ था | २ रा | ६ वा |
| बुध. | ५ वा | १६ | २० | ८ वा | २ रा | १४ वा | ४ था |
| गुरु | ८ वा. | २८ | ३२ | ६ वा | १४ वा | १२ वा | २ रा |
| शुक्र | ३ रा | ८ | १२ | ४ था | १२ वा | १० वा | १४ वा |
| शनि | ६ वा. | २० | २४ | २ रा | १० वा | ८ वा | १२ वा. |

ॐ एका दिवसाचे यामार्ध ८ व कुलिकादि १६ वारपरत्वें जाणावे परंतु ज्यावारीं जे वर्जावयाचे ते कोष्टकांत लिहिल्या प्रमाणें वर्जावे.

दोष. लत्तादोष ॥ ॥ भौमाब्ध्याकृतिषट्जिनाष्टनखभंहंत्यग्रतोल त्तयारवेर्दोर्केकमितंशशीमुनिमितंपूर्णोनसन्मागधे ॥ ५७॥

**अर्थ-** भौमज्या नक्षत्रीं असेल त्यापासून तृतीय नक्षत्रीं लत्तादोष आहे. आणि बुध ज्या नक्षत्रीं असेल त्यापासून २२वे न०, गुरु ज्या नक्षत्रीं असेल त्यापासून ६ वें नक्षत्रीं, शुक्र ज्या न० अ० त्या० २४वे नक्ष०, शनि ज्यान० अ० त्यापा० ८वे न०, राहु ज्यान० असेल त्यापा० २०वे न०, रवि ज्यान० अ० त्यापा० १२ वे न० आणि चंद्र पूर्ण अ० ७ वे नक्षत्रीं लत्तादोष होतो. हा दोष मागध देशीं अशुभ, अन्यदेशीं निषेध नाहीं.

### ग्रहणवउत्पातनक्षत्रदोष

यस्मिन्धिष्ण्येमहोत्पातोग्रहणंवाभवेद्यदि ॥ तस्मिन्धिष्ण्येशुभंकर्मषण्मासंवर्जयेद्बुधः ॥५८॥

**अर्थ-** ज्या नक्षत्रीं उत्पात किंवा ग्रहण झालें असेल तें नक्षत्र सहा महिनेपर्यंत शुभकर्मास वर्जावें.

पापग्रहयुक्त आणिविद्धनक्षत्रें ॥ ॥ श्रुत्यग्निभेऽभिजिद्ब्राह्मेवैश्वेहस्तेषुरुद्रभे ॥ मूलादित्येचपुष्येंद्रमैत्रास्लेषमघांतके ॥ ५९ ॥ दस्त्रभाग्येऽर्यमर्क्षेचहस्ताहिर्बुध्न्यभेतथा ॥ चित्राजचरणेस्वातीवारुणेचपरस्परं ॥ ६० ॥ वासवेंद्राग्निभेतद्वद्वेधःसप्तश-

लाकजः॥ त्याज्यःपापोद्भवोयत्नाद्भ्नबंधादिकर्मसु॥६१॥

**अर्थ-** पंच सप्त शलाकांमध्यें ज्या रेषेवर जें नक्षत्र असेल त्या नक्षत्रीं पापग्रह असतां त्याचे समोरचें नक्षत्र विद्ध होतें तें यत्नें करून व्रतबंधादि शुभकर्मास वर्जावें.

पंचशलाकाचक्र

कृ रो मृ आ पु पु आ

भ अ रे उ पू श ध — म पू उ ह चि स्वा वि

श्र अ उ पू मू ज्ये अ

सप्तशलाकाचक्र

कृ रो मृ आ पु पु आ

भ अ रे उ पू श ध — म पू उ ह चि स्वा वि

श्र अ उ पू मू ज्ये अ

## नक्षत्रचरणवेध.

सप्तपंचशलाकाभ्यांविद्धमेकार्गलेनयत्॥ लत्तोपग्रहगंधि
ष्ण्यंपादमात्रंशुभेत्यजेत्॥ ६२॥ वेधमाद्यन्त्ययोरंघ्र्योरन्योन्य
द्वितृतीययोः॥ क्रूरेसपित्यजेत्पादंकेचिदूचुर्महर्षयः॥६३॥

**अर्थ-** विद्धनक्षत्र, एकार्गला, लत्ता आणि उत्पातनक्षत्र याठिकाणीं शुभग्रह असतां तो ज्याचरणीं असेल तोचरण शुभकर्मासवर्जावा आणि पापग्रह असेलतर सर्व नक्षत्र वर्जावें. नक्षत्राचे प्रथम व चतुर्थ चरण आणि द्वितीय व तृतीय चरण यांचा परस्परें वेध होतो असें जाणावें. कांहीं ऋषींच्यामतें पापग्रहांचा वेध असलातरी चरणच वर्ज्य आहे.

एकार्गलादोषमार्तंडमतें॥ विष्कंभादि दुष्टयोगरहित दिननक्षत्रापासून अभिजित् सह गणून विषम नक्षत्रीं सूर्य असतां एकार्गलादोष होय.

चंडायुध॥ ॥शूलगंडातिपातानांसाध्यहर्षणयोस्तथा॥
अंतिमंचंद्रभंतस्मिन्नेतच्चंडायुधंनसत्॥६४॥

**अर्थ-** शूल, गंड, व्यतीपात, साध्य, हर्षण, वैधृति या योगांचे अंतीं जें नक्षत्र असेल त्यास चंडायुध दोष होय.

क्रांतिसाम्य॥ ॥युग्मेधनुःकर्किरलोचयुक्तेकन्याचमीने
वृषनक्रयुक्ते॥ मेषेचसिंहेचघटेतुलाया
क्रांतेश्वसाम्यंशशिसूर्ययोगे॥६५॥ ७ ॥ ७॥

**अर्थ-** धन व मिथुन यालग्नीं चंद्र व सूर्य असले ह्मणजे आणि तसेंच कर्क, वृश्चिक; कन्या, मीन; वृषभ,मकर,मेष,सिंह, व कुंभ, तूळ, या लग्नीं असले तर क्रांति साम्य होतें

चक्राचाक्रम॥ ॥ उर्ध्वेरेखात्रयंचैवतिर्यग्रेखात्रयंतथा॥ क्रांतिसाम्यंबुधैर्ज्ञेयंमध्येमीनंतुयोजयेत्॥ ६६ ॥.

**अर्थ-** तीन उर्ध्वरेषा आणि तीन आडव्या रेषा काढून ऊर्ध्वमध्यरेषेवर मीनल ग्नापासून क्रम मांडून द्वादश लग्नांचें क्रांति साम्य चंद्र आणि सूर्य समोरा समोर आले असतां होतें. हा दोष कोसल देशीं वर्ज्य होय.

कुं. मी. मे.
म. वृ.
ध. मि.
वृ. क.
तू. क. सिं.

## जामित्रदोष.

लग्नेंदूनोस्तगःपापस्तत्तुल्यांशोयदिस्थितः॥ तदाजामित्रदोषःस्यान्नहिन्यूनाधिकांशके॥ ६७॥ क्रूरोवायदिवा सौम्योलग्नाच्चंद्राच्चखेचरः॥एकोपियदिजामित्रे समांशेचयदाभवेत्॥ ६८ ॥जामित्रंनप्रशंसंति गर्गकाश्यपदेवलाः॥ आयषष्ठतृतीयेषुधनधान्यप्रदोरविः ६९

**अर्थ-** लग्नचंद्रामध्यें सप्तमस्थानाच्या पापग्रह न्यून करून तत्तुल्यांश आ- ला असतां जामित्र दोष होय आणि न्यून असता दोष नाहीं. दुसरा पक्ष. ल ग्न चंद्रापासून सप्तम स्थानीं शुभ ग्रह असतां अथवा पापग्रह समांश अस- तां जामित्र दोष होय. तो गर्ग, काश्यप, देवल ह्या ऋषींच्या मतें विवाहास वर्जा वा. जर लग्नापासून एकादश, षष्ठ अथवा तृतीय ह्या स्थानीं सूर्य असेल तर जामित्र दोष शुभप्रद जाणावा.

चरत्रयदोष॥ ॥कर्कलग्नेऽथवामेषेधरांशोयदिदीयते तुलायांमकरेचंद्रेवैधव्यंजायतेध्रुवम्॥ ७०॥

**अर्थ-** कर्क आणि मेष यालग्नीं तुळांश आणि मकराचा अथवा तूळीचा चं द्र असे योगांचे दोष वैधव्य कारक होत. ते वर्जावे.

तिथिपरत्वेलग्नेवर्ज्य॥ ॥ प्रतिपदितुलामकरौसिंहमकरौ तृतीयायां॥कन्यामिथुनेपंचम्यांसप्तम्यांचैवधनुषकर्कौ ॥७१॥नवम्यांकर्कसिंहावेकादश्यांतुधनुर्मीनौ॥ त्रयोदश्यांवृषभमीनौभून्यलग्नानितिथियोगात्॥ ७२॥.

**अर्थ-** प्रतिपदेस तूळ, मकर; तृतीयेस सिंह, मकर; पंचमीस कन्या, मिथु-

गृहायुष्यप्रमाण॥ जीवोबुधोभृगुर्व्योम्नि लाभगोभानुभूमिजो॥ प्रारंभेयस्य तस्यायुः समाशीतिःसहश्रियः ॥६०॥

अर्थ- गुरु, बुध किंवा शुक्र हे दशमस्थानीं आणि रवि, भौम एकादशस्थानीं गृहारंभास आले तर तें गृह लक्ष्मी सहित ८० वर्षे पर्यंत नांदेल.

स्वोच्चवर्तिनिभृगौविलग्नगेदेवमंत्रिणि रसातलेऽथवा स्वोच्चगेरविसुतेऽथवायगेस्यात्स्थिति श्चसुचिरंसहश्रिया ६१

अर्थ- लग्नीं शुक्र, चतुर्थस्थानीं गुरु, आणि एकादशस्थानीं शनि असे असून स्वोच्च लग्नीं असतां घरास आरंभ केला तर तें गृह चिरकाल लक्ष्मीयु० असे.

स्वर्क्षगेहिमगेलाभेसुरेज्येकेंद्रसंस्थिते ॥ धनधान्यसुतारोग्ययुतंधामचिरंभवेत् ॥६२॥ श्रीशम् ॥ ॥

अर्थ- कर्कीचा चंद्र एकादशस्थानीं आणि गुरु केंद्रस्थानीं असा योग लग्नीं असला तर धन, धान्य, सुत, आणि आरोग्य यानीं युक्त तें गृह चिर० राही.

अन्यमतें पृथ्वी शोधण्या० प्रकार.

कुंडार्थपृथ्वीपरिशोधहेतवेप्रष्टुर्मुखाद्यः प्रथमंस्फुटी भवेत् वर्गादिवर्णः किलतद्दिशिस्मृतंशल्यंमुनींद्रैर्हप येस्तुमध्यतः ६३ स्मृत्वेष्टदेवताप्रष्टुर्वचनस्याद्यमक्षरम् गृहीत्वातुततः शल्याशल्यंसम्यग्विचार्यते ६४

अर्थ- कुंडार्थ अथवा नूतनगृह करण्यास प्रथम जागा शोधण्याचा प्रकार. पृच्छकानें इष्ट देवतांचें स्मरण करून विप्रास प्रश्न करावा. विप्रानें पृच्छकाच्या मुखांतून ज्या वर्गातील आदि अक्षर येईल त्याचें उत्तर अ क च ट त प य श वर्ग पूर्वादि अष्ट दिशांस आणि मध्य भागीं ह प य वर्गांचे आदि अक्षर येईल त्या जाग्यांत अमुक शल्य आहे त्याचा प्रकार खालीं लिहिला आहे त्या वरून फलश्रुती त्या त्या जाग्यास पहावी.

प्रश्नाक्षरफळें॥ ॥ पृच्छायांयदिअः प्राच्यांनरशल्यं तदाभवेत् ॥ सार्धहस्त प्रमाणेनतच्च मानुषमृत्युकृत् ६५ आग्नेय आग्नेय्यांदिशिकः प्रश्नेखरशल्यंकरद्वये॥ राजदंडोभवेत्तत्रभयंनैवानिवर्तते ६६ दक्षिण॥ याम्यायांदिशिचः प्रश्नेतदास्यात्कटिसंस्थितम् ॥ नरशल्यंगृहेतस्यमरणंचिररोगतः॥ ६७॥ नैर्ऋत्य ॥

नैर्ऋत्यांयदिटःप्रश्ने सार्धहस्तादधःस्थले॥ श्वुनो-
स्थिजायते तस्य बालानां जायतेमृतिः ॥ ६८ ॥ पश्चिम
पश्चिमायांतुतः प्रश्नेशिशोः शल्यंप्रजायते॥सार्धहस्ते
गृहस्वामीनतिष्ठतिसदागृहे॥ ६९॥ वायव्य॥ वायव्या
दिशिपः प्रश्नेतुषांगाराश्चतुष्करे॥ कुर्वंतिमित्रनाशंच
सदादुःस्वप्नदर्शनम् ७० उत्तर॥ उदीच्यांदिशियःप्र
श्नेविप्रशल्यंकटेरधः॥ तच्छीघ्रंनिर्धनत्वायकुबेरसह
स्यहि॥७१॥ ईशान्य॥ ईशान्यांयदिशःप्रश्नेगोशल्यं
सार्धहस्ततः॥ तद्गोधनस्यनाशायजायते गृहमेधिनः ७२
मध्यभागीं॥ ॥ हपयामध्यकोष्टेचवक्षोमात्रेभवेदधः
नृकपालमथोभस्मलोहंतत्कुलनाशकृत्॥ ७३ ॥ श्री ॥

**अर्थ**- पृच्छकाचे मुखांतून अवर्गाचें आदिअक्षर आलेंतर पूर्वेचे कोष्टकां त दीडहात ओंड खणलें असतां नराचीं हाडें सांपडतील. तीं न काढल्यास मृत्यकारक होत. १ कवर्गाचें आदिअक्षर आल्यास आग्नेयकोणीं २ हात ओं डावर खराच्या आस्थि सांपडतील त्या न काढल्यास राजदंडापासून भयनिवृ त्ति होणार नाहीं. २ च अक्षर आल्यास दक्षिणेस कंबरे बरावर ओंड खणावें नराच्या आस्थि सांपडतील त्या न काढल्यास मरणप्राय चिरकाल रोगी ३ ट अक्षर आल्यास एक हातावर कुत्र्याच्या आस्थि सांपडतील त्या न काढल्यास मुलें वांचणार नाहींत. ४ त अक्षर आल्यास मुलाचीं हाडें दीड हातावर सांपडतील तीं न काटल्यास त्या घरांत गृहस्वामीचें वास्तव्य होणार नाहीं. ५ प अक्षर आल्यास वायव्य कोणास ४ हातांवर तूस (कोंडा) व कोळसे सांपडतील ते न काढल्यास मित्रनाश व नित्य दुःस्वप्न दर्शन होईल ६ य अक्षर आल्यास उत्तरेस एक हातावर ब्राह्मणाच्या अस्थि सांपडतील त्या न काढल्यास कुबेरा सारखा धनवान असला तरी दरिद्री होईल ७ श अक्षर आल्यास ईशान्य कोणीं दीड हातावर गायीच्या आस्थि सांपडतील त्या न काढल्यास गोधनाचा नाश होईल. ८ ह प य मध्यभागीं छातीवर ओंडीवर नराचें कपाल आणि भस्म व लोह सांपडेल तें न काढलें तर कुळाचा नाश होईल. ९ याप्रकारें ज्या वर्गांतील नांव येईल त्या दिशेस पहावें आणि वर्णांचें आदि अक्षर पृच्छकाचे मुखांतून त्या व-

र्णाशिवाय दुसरें काहीं आल्यास त्याचें फळ कांहीं घेऊंनये

यात्राप्रकरण.

सन्मुखशुक्र ॥ एकग्रामेपुरेवापि दुर्भिक्षेराष्ट्रविप्लवे ॥ विवाहे तीर्थयात्रायां प्रतिशुक्रोनविद्यते ॥ ७४ ॥ श्री

अर्थ- गांवचे गांवांत अथवा शहराचे शहरांत, दुर्भिक्ष काळीं, राजाचें धरणें येतें त्यास, विवाह समयीं, तीर्थ यात्रेस सन्मुख शुक्राचा दोष नाहीं.

पौष्णादावग्निपादांतं यावत्तिष्ठतिचंद्रमाः ॥ तावच्छुक्रोभवेदंधः सन्मुखंगमनंशुभम् ॥ ७५ ॥

अर्थ- रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका या नक्षत्रांचे प्रथम चरणीं चंद्र आला ह्मणजे शुक्र अंध असतो. तो गमनकाळीं सन्मुख असला तरी दोष नाहीं.

॥ शुभाशुभफळ ॥

दक्षिणेदुःखदःशुक्रःसन्मुखोहंतिमंगलम् ॥ वामेपृष्ठेशुभोनित्यंरोधयेदस्तगःशुभः ॥ ७६ ॥ श्रीराम

अर्थ- बाहेर जातांना शुक्र दक्षिणेस दुःखदायक. सन्मुख कार्यहानिः वामभागीं किंवा पृष्ठभागी घेऊन गमन केलें असतां शुभ होय. पूर्वेस अस्त असतांतर पश्चिमेस शुभ. आणि पश्चिमेस अस्त असतांतर पूर्वेस शुभ.

घातचंद्र ॥ ॥ प्रयाणकालेयुद्धेचकृषौवाणिज्यसंग्रहे ॥ वादेचैवगृहारंभेवर्जयेद्घातचंद्रकं ॥ ७७ ॥ श्रीराम

अर्थ- यात्रेस जातांना, युद्धास कृषि करण्यास, व्यापारास, धान्यादि संग्रहास वादाचे समयीं आणि गृहारंभास घातचंद्र वर्ज करावा. ॥ ७७ ॥

घाततिथ्यादि ॥ ॥ घाततिथिर्घातवारोघातनक्षत्रमेव च ॥ यात्रायांवर्जयेत्प्राज्ञैरन्यकर्मसुशोभनं ॥ ७८ ॥

अर्थ- गमन काळीं घातवार, घातनक्षत्र आणि घाततिथि अशी वर्ज्यावीं: अन्य कर्मास शुभ.

मेषेरविर्मघाप्रोक्ताप्रतिपत्प्रथमचंद्रमाः ॥ वृषभेपंचहस्तश्च चतुर्थीशनिरेवच ॥ ७९ ॥ मिथुनेनवमीस्वाती अष्टमश्चंद्रवासरः ॥ कर्केद्विरनुराधाचबुधषष्ठींविवर्जयेत ॥ ८० ॥ सिंहेषष्ठश्चंद्रमाश्चदशमीशनिमूलकम् ॥ कन्यायांदशमश्चंद्रः श्रवणःश-

निरष्टमी ॥ ८१ ॥ तूले गुरुर्द्वादशी स्याच्छतं तृतीयचंद्रमाः वृश्चिके रेवती सप्तदशमी भार्गवस्तथा ॥ ८२ ॥ धने चतुर्थी भरणी द्वितीया भार्गवस्तथा ॥ ॥ मकरेऽष्टमो रोहिणीच द्वादशी भौमवासरः ॥ ८३ ॥ कुंभे एकादशश्चंद्रश्चतुर्थी गुरुवासरः ॥ मीनेच द्वादशः सार्पा द्वितीया भार्गवस्तथा ॥ ८४ ॥

| रा. | मेष. | वृष. | मि. | कर्क | सिंह | कन्या | तूळ | वृश्चि | धन | मकर | कुंभ | मीन |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| चंद्र | १ | ५ | ९ | २ | ६ | १० | ३ | ७ | ४ | ८ | ११ | १२ |
| वार | र. | श. | सो. | बु. | श. | श. | गु. | शु. | शु. | भौ. | गु. | शु. |
| नक्ष. | मघा | ह. | स्वा. | अनु. | मू. | श्र. | शत. | रेव. | भर. | रोहि. | आर्द्रा | आश्ले |
| ति. | १ | ४ | ८ | ६ | १० | ८ | १२ | १० | २ | १२ | ४ | २ |

याप्रकारें मेषादि द्वादशराशिपरत्वें घातचतुष्टय स्वराशिस वर्जून प्रयाण करावें.

राशिपरत्वें कालचंद्र ॥ ॥ मेषे वेदो वृषे ष्टोच मिथुनेच तृतीयकः ॥ दश कर्के रविः सिंहे कन्यायां कः प्रकीर्तितः ॥ ८५ ॥ षट् तुले वृश्चिके रुद्रः धने रुद्राः प्रकीर्तिताः ॥ मकरे ऋषयः प्रोक्ताः कुंभे बाणा उदाहृताः ॥ मीने अंघ्रिः कालचंद्राः शौनकश्चेदमब्रवीत् ॥ ८६ ॥ श्रीशंकरम् ॥.

**अर्थ-** मेषराशिस ४ था चंद्र, वृषभास ८ वा, मिथुनास ३ रा, कर्कास १० वा, सिंहास १२ वा, कन्येस १ वा, तुळास ६ वा, वृश्चिकास १० वा, धनास ११ वा, मकरास ७ वा, कुंभास ५ वा, मीनास ४ था या प्रकारें राशिपरत्वें कालचंद्र शौनकमतें आहे तो सर्व कर्मास वर्ज करावा.

तिथिपरत्वें लग्नें वर्ज करावीं तीं.

नंदायामलिहर्योस्क तुलामकरयोस्तथा ॥ भद्रायां मीनधनुषोः कालस्तिष्ठति सर्वदा ॥ ८७ ॥ जयायां स्त्रीमिथुनयोः रिक्तायां मेषकर्कयोः ॥ पूर्णायां कुंभवृषयोर्मनुष्यमरणं ध्रुवम् ॥ ८८ ॥

**अर्थ-** नंदातिथींस वृश्चिक, सिंह, तूळ, मकर, हीं लग्नें आणि भद्रातिथींस मीन, धन, व जया तिथींस कन्या, मिथुन व रिक्ता तिथींस मेष, कर्क, व पूर्णा तिथींस कुंभ, वृषभ, या तिथींस हीं लग्नें वर्जावी. तेथें काळ उभा असतो यास्तव न वर्जिल्यास मनुष्य निश्चयपूर्वक मरण पावेल असें जाणावें. ८८

॥ प्रयाणास उक्त नक्षत्रें ॥

हस्तेंदुमैत्रश्रवणाश्विनितिष्यपौष्णाश्रविष्ठाच-
पुनर्वसूच॥ प्रोक्तानिधिष्ण्यानिनवप्रयाणे-
त्यक्त्वात्रिपंचादिमसप्ततारा: ॥८९॥ ॥

अर्थ- हस्त, मृग, अनुराधा, श्रवण, आश्विनी, पुष्य, रेवती, धनिष्ठा, पुनर्व
सू हीं नऊ नक्षत्रें प्रयाणास उक्त परंतु ३।५।१।७ ह्या तारागमनास वर्ज करा०

मध्यमनक्षत्रें॥ ॥ रोहिणीउत्तराचित्रामूलमार्द्रातथै
वच।षाढोत्तराभाद्रविश्वेप्रस्थानेमध्यमास्मृताः॥९०॥

अर्थ- रोहिणी, उत्तरा, चित्रा, मूळ, आर्द्रा, पूर्वाषाढा, उत्तरा भाद्रपदा, उत्त
राषाढा, हीं नक्षत्रें प्रयाणास मध्यम होत.

वर्ज्यनक्षत्रें॥ ॥त्रीणिपूर्वामघाज्येष्ठाभरणीजन्म
कृत्तिका॥ सार्पस्वातीविशाखाश्च गमंनित्यंविवर्ज
येत्॥९१॥ कृत्तिका एकविंशत्योभरण्याः सप्तना-
डिकाः॥एकादशमघायाश्चत्रिपूर्वाणांचषोडश ९२
विशाखासार्पचित्राश्च स्वात्यांरौद्रेचतुर्दश ॥आद्या
स्तु घटिकास्त्याज्याः शेषाशेगमनंशुभम् ॥९३॥

अर्थ- हीं नक्षत्रें प्रयाणास वर्ज्य करावीं. परंतु संकट समयास तिन्ही पू
र्वा यांच्या १६।१६ घटिका, मघा, ११ घटिका, ज्येष्ठा संपूर्ण, भरणी, सा
त घ०, कृत्तिका २१ घ०, जन्म नक्षत्र संपूर्ण. आश्लेषा, विशाखा, चित्रा,
स्वाती, आर्द्रा, ह्यांच्या आद्य १४।१४ घ० प्रमाणें सर्व वर्ज्य घ० टाकून प्रया०क०

प्रयाणासशुभाशुभवार॥ ॥ अर्केक्लेशमनर्थकंच-
गमनेसोमेचबंधुप्रियंचांगारेनलतस्करज्वरभयं-
प्राप्नोतिचार्थंबुधे॥ क्षेमारोग्यसुखंकरोतिचगुरौला
भश्चशुक्रेशुभोमंदेबंधनहानिरोगमरणान्युक्ता-
निगर्गादिभिः॥९४॥

अर्थ- रविवारीं गमन केलें असतां मार्गी महाक्लेश. व अनर्थ प्राप्त होतात.
सोमवारीं बंधु आणि प्रिय यांचें दर्शन. मंगळवारीं अग्नि. चोर व ज्वर यांपा
सून भय. बुधवारीं द्रव्यप्राप्ति. गुरुवारीं क्षेम, आरोग्य व सुख यांची प्राप्ति
शुक्रवारीं लाभ. व शुभ फल प्राप्ति - शनिवा० बंधन, हानि, रोग, मरण, यां प्रा.

## होराकथन व शकुन.

वारात्षष्ठस्यषष्ठस्यहोरासार्धद्विनाडिका ॥ अर्कशुक्रौबु
धश्चंद्रोमंदोजीवधरासुतौ ॥ ९५ ॥ गुरुर्विवाहेगमनेचशु
क्रोबोधेसौम्यः सर्वकार्येषुचंद्रः ॥ कुजेचयुद्धंरविराजसेवामंदे
चवित्तंत्विति होरयोगाः ॥ ९६ ॥ यस्यग्रहस्यवारेपिकर्मकिंचित्प्रकी
र्तितम् ॥ तस्यग्रहस्यहोरायांसर्वकर्मविधीयते ॥ ९७ ॥ श्रीशं० ॥

**अर्थ-** ज्या वाराचा त्या वारीं प्रथम २॥ घटिका होरा. त्यापासून ६ वे वारा. चा दुसरा होरा. याक्रमानें दिवसाचें १२ होरे जाणावे. २॥ घटिका रविवाराचा होरा राजसेवेस उक्त. द्वितीय २॥ घ० शुक्राचा गमनास. तृतीय बुधाचा ज्ञा नप्राप्तीस चतुर्थ २॥ घ. चंद्राचा तो सर्वकार्यास. पांचवा शनीचा द्रव्य- संग्रहास. ६ वा गुरूचा विवाहास. ७ वा मंगळाचा युद्धास जाण्यास उक्त. याप्रकारें क्रम जाणावा. आणि ज्या ज्या ग्रहास जो जो वार त्याचीं कृत्यें पूर्वी कथिलीं आहेत तीं त्यात्या वाराचे होऱ्यावर करावीं ॥ ९७ ॥ श्रीः ॥

### सूर्याचा होरा.

सूर्यस्यहोरे रजकीसुवस्त्रंकुमारिकाविप्रचतुष्टयंच ॥
काकत्रयंद्वौनकुलौतथैवचाषस्तथैकोवृषभस्तुगौश्च ९८

**अर्थ-** सूर्याच्या होऱ्यावर गमन केलें असतां पुढें शकुन होतील ते सांग तों. परीट, स्वच्छवस्त्रें, कुमारिका, चार ब्राह्मण, तीन कावळे, २ मुंगुस २ चाष, १ बैल आणि गाय यांतून कांहीं तरी शकुन भेटतील, असें जाणावें.

### चंद्राचा होरा.

चंद्रस्यहोरेद्विजयुग्मकाकभेरीमृदंगानकुलःखरोष्ट्रौ.
हयश्चगोमेषश्वानौतथैवपुष्पाणिनारीद्वयमेवमार्गे ९९

**अर्थ-** चंद्राचे होऱ्यावर गमन केलें असतां मार्गाचे ठायीं २ ब्राह्मण, काक, नगारे, मृदंग, मुंगुस, गाढव, उंट, घोडा, गाय, मेंढा, कुत्रे, पुष्पें आणि २ स्त्रि या यांतून कांहीं भेटावीं.

### मंगळाचा होरा.

मार्जारयुद्धंकलहःकुटुंबेरजस्वलास्त्रीभवनस्यदाहः ॥
नपुंसकःश्वत्रितयंद्विजश्चनभोविमुक्तोधरणीसुतस्य १००

**अर्थ-** मंगळाचे होऱ्यावर गेलें असतां मार्जारांचें युद्ध, स्त्रीपुरुषांचा क-

लहू, रजस्वला स्त्री, घरजळतें, नपुंसक, ३ कुत्रीं किंवा नग्न ब्राह्मणभेटेल.

## बुधाचा होरा.

बुधस्यहोरेशकुनश्चसर्वः स्त्रीपुत्रयुक्ताकलशश्चपूर्णः
स्वचातकश्चाषगजौकुमारः पुष्पाणिनारीखलुदर्पणंच१

**अर्थ-** बुधाचे होऱ्यावर सर्व शकुन स्त्रीपुत्रयुक्त, पाण्यानें भरलेला कलश, चातकपक्षी, चाषपक्षी, गज, कुमार, पुष्पें, स्त्री, आरसा, यांतून कांहीं-तरी भेटतील.

## गुरूचा होरा.

गुरोर्द्विजातिर्गणिकाचधेनुः स्त्रीबालयुक्ता सजलोघट
स्तः॥ ऊर्णाचकाकोनकुलोबकश्च हंसस्यराजाबहवश्च
वैश्याः॥ १०२ ॥

**अर्थ-** गुरूचे होऱ्यावर गमन केलें तर मार्गाचेठायीं ब्राह्मण, कलावंतीण, गाय, मुलासहित स्त्री, भरलेली घागर, धाबळी, काक, मुंगुस, बगळा, हंसाचा राजा, बहुत वाणी यांतून कांहीं भेटतील.

## शुक्राचा होरा.

शुक्रस्य होरेगणिकाद्विजेंद्रः काकत्रिकंचाथनपुंसकोवा
मद्यंचमांसंगणिकाचधेनुर्धान्यंचशूद्रत्रितयंचवैश्यः ३

**अर्थ-** शुक्राचे होऱ्यावर प्रथम ब्राह्मण, कलावंतीण, ३ कावळे, नपुंसक, मद्य, मांस, गणक (जोशी) गाय, वाणी, धान्य, ३ शूद्र यांतून कोणी तरी भेटतील.

## शनीचा होरा.

पतंगसूनोर्यवनश्चनग्नो रजस्वला स्त्री मृतकंतथैव ॥.
पिशाचगृध्रोविधवाचवन्हिर्नपुंसकश्चाथयुवा प्रचंडः ४

**अर्थ-** शनीच्या होऱ्यावर नग्नयवन, रजस्वलास्त्री, प्रेत, पिशाच, गृधपक्षी, विधवा स्त्री, आग्नि, नपुंसक, तरूण असून बळकट असा पुरुष यांतून कोणी तरीभेटेल याप्रमाणें शकुन जाणावे.

मनूचेवाक्य॥ ॥ गमनप्रतिराज्ञस्तुसन्मुखादर्शनेनतु
प्रशस्तांश्चैवसंभाषेत्सर्वानेतांश्चकीर्तयेत् ॥ १०५॥ श्रीः

**अर्थ-** राजाप्रत सांगतात गमनकाळीं पूर्वीशकुन सांगितले ते किंवा उत्तम

भाषणें यांचें श्रवण, दर्शन न झालें तर त्यांचें मनांत स्मरण करून गमन करावें शुभ होय.

## वारपरत्वें वस्त्रधारण.

रवौ नीलं बुधे पीतं कृष्णवर्णं शनैश्चरे ॥ श्वेतं गुरौ भृगौ
भौमे रक्तं सोमे तु चित्रकम् ॥ ५ ॥

अर्थ- रविवारीं निळें, बुधवारीं पिवळें, शनिवारीं काळें, गुरुवारीं आणि शुक्रवारीं पांढरें, मंगळवारीं तांबडें आणि सोमवारीं चित्रवर्ण या प्रकारें वस्त्रधारण करून गमन करावें.

## नक्षत्र तिथि वार परत्वें दिक्शूल वर्ज्य.

पूर्वदिशा ॥ मूलश्रवणशाक्रेषु प्रतिपन्नवमीषु च ॥ शनौ
सोमे बुधे चैव पूर्वस्यां गमनं त्यजेत् ॥ ६ ॥ श्रीराम ॥

अर्थ- मूळ, श्रवण, ज्येष्ठा, नक्षत्रें, आणि प्रतिपदा, नवमी आणि शनिवार, सोमवार, बुधवार, यांवर पूर्वेस गमन करूं नये.

दक्षिणदिशा ॥ ॥ पूर्वाभाद्रपदाश्विनी पंचमी च त्रयोद
शी ॥ गुरुर्धनिष्ठार्द्रा चैव याम्यसप्त विवर्जयेत् ॥ ७ ॥ ७

अर्थ- पूर्वाभाद्रपदा, अश्विनी आणि तिथि पंचमी, त्रयोदशी, गुरुवार, धनिष्ठा, आर्द्रा हीं ७ दक्षिण दिग्गमनास वर्ज करावीं.

पश्चिमादिशा ॥ ॥ रोहिण्यां च तथा पुष्ये षष्ठीं चैव चतुर्द
शी ॥ भौमार्कगुरुवारेषु न गच्छेत्पश्चिमां दिशम् ॥ ८ ॥

अर्थ- रोहिणी, पुष्य, षष्ठी, चतुर्दशी, मंगळ, रवि, गुरु हे वार यांवर पश्चिम दिशेस गमन करूं नये.

उत्तरदिशा - करे चोत्तरफाल्गुन्यां द्वितीया दशमी तथा
बुधे रवौ भानुवारे न गच्छेदुत्तरां गतिम् ॥ ९ ॥ रामचंद्र ॥

अर्थ- हस्त, उत्तरा फा० आणि द्वितीया, दशमी व बुध, रवि, भौम हे वार यांवर उत्तर दिशेस गमन वर्जावें

विदिक्शूल ॥ ॥ ईशान्यां ज्ञशनौ शूलो आग्नेय्यां गुरुसो
मयोः ॥ वायव्यां भूमिपुत्रस्य नैर्ऋत्यां शुक्रसोमयोः ११०

अर्थ- वारपरत्वें शूल विदिशांस असतो ती दिशा त्या वारीं गमनास वर्जावी बुध आणि शनि या वारीं ईशान्य दिशेस गमन वर्जावें. गुरु आणि सोम या वारीं आग्नेयेस वर्जावें. भौमवारीं वायव्येस आणि शुक्र व रवि या वारीं

नैर्ऋत्यदिशेस गमन वर्जावें.

### शूलदोषनिवारणार्थ पदार्थ भक्षण करणें.

सूर्यवारे घृतं पीत्वा सोमवारे पयस्तथा॥ गुडमंगारवारे तु बुधवारे तिलानपि॥११॥ गुरुवारे दधि ज्ञेयं शुक्रवारे यवानपि॥ माषान्भुक्त्वा शनेर्वारे स्थूलदोषोपशांतये॥११२॥

अर्थ- रविवारीं घृत, सोमवारीं दूध, हीं प्राशन करावीं. मंगळवारीं गूळ व बुधवारीं तिळ खावे. गुरुवारीं दधिप्राशन करावें. शुक्रवारीं जव खावे. शनिवारीं उडदांचें अन्न खावें. असें वार परत्वें भक्षण करून नंतर गमन करावें.

### कुंभमीनगत चंद्रावर वर्ज्य कर्मे.

शय्याविनानं प्रेताग्निक्रियाकाष्ठतृणार्जनम्॥ याम्यदिग्गमनं कुर्यान्न चंद्रे कुंभमीनगे॥११३

अर्थ- पलंग, बाज इत्यादिक विणणें, प्रेताग्निकर्म, काष्ट व तृण यांचा संग्रह आणि दक्षिणदिशेस गमन हीं सकळ कर्मे कुंभ व मीन या राशींच्या चंद्रावर वर्जावीं.

सन्मुखचंद्र॥ ॥करणभगणदोषं वारसंक्रांतिदोषं कुतिथि कुलिकदोषं यामयामार्धदोषम्॥ कुजशनिरविदोषं राहुकेत्वादिदोषं हरति सकलदोषं चंद्रमाः सन्मुखस्थः॥१४॥

अर्थ- करण, नक्षत्र, वार, संक्रांति, कुतिथी, यामार्ध, मंगळ, शनि, रवि, राहु केतु इत्यादि दोष सन्मुख चंद्र घेऊन गमन केलें असतां जातात.

दिशापरत्वें सन्मुखचंद्र॥ ॥मेषे च सिंहे धन पूर्वभागे वृषे च कन्यामकरे च याम्ये॥ तूले च कुंभे मिथुने प्रतीच्यां कर्कालिमीने दिशि चोत्तरस्याम्॥१५॥ फलश्लोक॥ ॥सन्मुखो अर्थलाभाय दक्षिणे सुखसंपदो॥ पृष्ठतः प्राणनाशाय वामे चंद्रे धनक्षयः॥१६॥

अर्थ- मेष, सिंह, धन, या राशीचा चंद्र पूर्वेस, वृषभ, कन्या, मकर यांचा दक्षिणेस, तूळ, कुंभ, मिथुन यांचा पश्चिमेस कर्क, वृश्चिक, मीन, या राशींचा चंद्र उत्तरेस. फळ सन्मुख चंद्र घेऊन गमन केलें असतां अर्थलाभ होईल. आणि उजवे बाजूस घेतलातर सुखसंपत्ति प्राप्त होतील पृष्ठभागीं घेतलातर प्राणनाश होईल आणि वामभागीं घेऊन गमन केलें असतां ध-

नाचा क्षय होईल.

काळवेळापाहणें॥ ॥पूर्वाण्हेचोत्तरंगच्छेत्प्राच्यांमध्या न्हकेतथा॥ दक्षिणेअपराण्हेतुपश्चिमेअर्धरात्रके ॥१७॥

अर्थ- दिवसा प्रथम प्रहरीं उत्तरेस, द्वितीय प्रहरीं मध्यान्हीं पूर्वेस, तृतीय-प्रहरीं अपराण्हीं दक्षिणेस आणि अर्धरात्रीं पश्चिमेस गमन करावें. उक्त होय असें जाणावें.

दिशापरत्वेंयोगिनी

प्रतिपन्नवमीपूर्वेद्वितीयादशचोत्तरे॥ तृतीयेकादशीव न्हौचतुर्द्वादशिनैर्ऋते॥ १८॥ पंचत्रयोदशीयाम्येषष्ठीपूर्णेच पश्चिमे॥सप्तमीपूर्णवायव्ये अमावास्याष्टमीशिवे॥ १९॥ फळ॥ पृष्ठेचशुभदाप्रोक्तावामेचैवविशेषतः॥ योगिनीसाभवेन्नित्यंप्रयाणेशुभदानृणाम॥ २०॥ ७॥

अर्थ- प्रतिपदा, नवमी, या तिथींस योगिनी पूर्वेस. द्वितीया, दशमी उत्तरेस, तृतीया, एकादशी आग्नेयेस, चतुर्थी, द्वादशी नैर्ऋत्येस पंचमी, त्रयोदशी दक्षिणेस. षष्ठी, चतुर्दशी पश्चिमेस. सप्तमी, पूर्णिमा वायव्येस, आणि अमावास्या, अष्टमी ईशान्येस. याप्रमाणें योगिनी जाणाव्या. यांचें फळ. योगिनी पृष्ठभागीं अथवा वामभागीं घेऊन नित्यानित्य गमन करावें शुभ होय.

वारपरत्वेंकाळराहु

अर्कोत्तरेवायुदिशांचसोमेभौमेप्रतीच्यांबुधनैर्ऋतेच॥ याम्येगुरौवन्हिदिशांचशुक्रेमंदेचपूर्वेप्रवदंतिकालः॥२१

अर्थ- रविवारीं काळ उत्तरेस, सोमवारीं वायव्येस, मंगळवारीं पश्चिमेस, बुधवारीं नैर्ऋत्येस, गुरुवारीं दक्षिणेस, शुक्रवारीं आग्नेयेस, शनिवारीं पूर्वेस, या प्रमाणें वार परत्वें काळ राहु जाणावा.

काळराहुफळ.

रविगुरुदिनपूर्वेसोमशुक्रेचयाम्येवरुणदिशिकुभौमेचोत्तरेसौरिसंस्थे।प्रतिदिनमितिगत्वाकालराहुर्दिशानांसकलगमनकार्येवामपृष्ठेचसिद्धिः॥१२२॥

अर्थ- रवि अथवा गुरु या वारीं पूर्वेस गमन केलें असतां काळराहु वामपृष्ठभागीं येतो. आणि सकल कार्यें सिद्धीस जातात सोम आणि शुक्र या वारीं दक्षिणेस गमन करावें. भौमवारीं पश्चिमेस गमन करावें शनि-

वारीं उत्तरेस गमनकरावें. तेणें करून कार्य सिद्धि होईल असें जाणावें.

क्षुधितराहु

इंद्रेवायौयमेरुद्रेतोयेग्नौशशिरक्षसोः ॥ यामार्धंक्षुधितो राहुर्भ्रमत्येवदिगष्टके ॥ २३ ॥ नतिथिर्नचनक्षत्रंनयोगोनच चंद्रमाः ॥ सिध्यंतिसर्वकार्याणियात्रायांदक्षिणेरवौ २४

**अर्थ**- प्रथम यामार्धीं क्षुधित राहु पूर्वेस असतो. द्वितीय वायव्येस, तृतीय दक्षिणेस चतुर्थ ईशान्येस. पंचम पश्चिमेस. षष्ठ आग्नेयेस. सप्तम उत्तरेस. अष्टम यामार्धीं नैर्ऋत्येस. याप्रमाणें अष्टदिशा भ्रमण करितो. परंतु दक्षिणभागीं रवि घेऊन गमन केलें असतां तिथिनक्षत्रादि दोषजातात.

काळ कोठें आहे तो पहावा.

कालंपलंघातकलोहपातवडन्नलाखड्ग कचोलकांतिकाः नखाश्चतुर्विंशतिषट्तलथादिकरुद्रा धृतिर्वेदगुणाः क्रमेण ॥ २५ ॥ तिथ्यायुतंवैवसुभाजितंचशेषश्चकालोमुनयो वदंति ॥ फल ॥ कालंचपृष्ठेपलसन्मुखेनघातंचलोहंवडवांच पृष्ठे ॥ खड्गंचचाग्रेकवचंचवामेकांतिश्चयोज्यादिशिदक्षिणस्यां २६

**अर्थ**- कालांची नावें २० काल १ पल २ घातक ३ लोहपात ४ वडवानल ५ खड्ग ६ कवच ७ कांतिक ८ अशीं ८ नावें व त्याखालीं अंक मांडले आहेत ते ज्या तिथीस गमन करावयाचें असेल ती तिथि एकेक अंकांत मिळवून आंठांनीं भागून शेष जे अंक उरतील त्या दिशेस तो काळ आहे. अशाक्रमानें पूर्वादि अष्ट दिशांस पहावें. फल. पृष्ठभागीं काळशुभ. सन्मुख फल शुभ. पृष्ठभागीं घातक, लोहपात, वडवानल हे तिन्ही शुभ. अग्रभागीं खड्ग शुभ वाम भागीं कवच शुभ आणि दक्षिणभागीं कांतिक शुभ अशीं दिशापरत्वें शुभ फळें पाहून त्या दिशेस युद्धांत अथवा यात्रादि कार्यास गमन करावें. तेणें करून कार्य सिद्धि होईल.

पंथाराहुचक्र.

स्युर्धर्मेदस्रपुष्योरगवसुजलपद्वीशमैत्राण्यथार्थेयाम्याजांघ्रींद्रकर्णादितिपितृपवनोडून्यथोभानिकामे ॥ वन्ह्यार्द्राबुध्न्यचित्रानिर्ऋतिविधिभगाख्यानिमोक्षेथरोहिण्यार्यम्णाहिर्बुध्न्यविश्वातिमभादिनकरर्क्षाणिपथ्यादिराहो ॥ १२७ ॥ श्रीः ॥

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| धर्म | अश्विनी | पुष्य | आश्लेषा | विशाखा | अनुराधा | धनिष्ठा | शततारा. |
| अर्थ | भरणी | पुनर्वसु | मघा | स्वाती | ज्येष्ठा | श्रवण | पूर्वाभाद्र. |
| काम | कृत्तिका | आर्द्रा | पूर्वा | चित्रा | मूळ | अभिजित | उत्तराभाद्र. |
| मोक्ष | रोहिणी | मृगशिर | उत्तरा | हस्त | पूर्वाषाढा. | उत्तराषा. | रेवती. |

अर्थ- नक्षत्रें २८ त्यांचे भाग ४ त्यांचीं नांवें. प्रथमभाग धर्ममार्गीचीं नक्षत्रें ७, द्वितीय अर्थमार्गींचीं नक्षत्रें ७, तृतीय काममार्गींचीं नक्षत्रें ७ चतुर्थ मोक्षमार्गीची नक्षत्रें ७ या प्रमाणें चहूं मार्गांचीं नक्षत्रें जाणावीं. त्यांत एक मार्गांचे नक्षत्रीं सूर्य असतां चंद्र चहूं मार्गां० नक्ष० फिरेल त्याचीं फळें सांगतों.

धर्ममार्गींचींफळें ॥ ॥ धर्ममार्गेगनेसूर्ये अर्थांशेचं
द्रमायदिनदाशत्रुभयंतस्यज्ञेयंतुविबुधैस्मृतं२८

अर्थ- धर्ममार्ग नक्षत्रीं सूर्य असतां अर्थमार्ग नक्षत्रीं चंद्र आल्यास गमन केलें तर मार्गांचे ठायीं शत्रुभय होईल, असें अशुभ फळ जाणावें.

धर्ममार्गेगतेसूर्येकामांशेचंद्रमायदि ॥
विग्रहे दारुणंचैवचौराकुलसमुद्भवं ॥ २९॥

अर्थ- धर्ममार्गी सूर्य आणि काममार्ग नक्षत्रीं चंद्र असे योगाचें फळ वैर-पुष्कळांशीं होईल आणि चोरापासून भय प्राप्त होईल.

धर्ममार्गेगतेसूर्येचंद्रेतत्रैवसंस्थिते ॥
संहारश्चभवेत्तत्रभंगोहानिःप्रजायते ३०

अर्थ- धर्ममार्गनक्षत्रीं सूर्य असतां व चंद्र असतां गमन केलें तर संहार भंग आणि हानि असें प्राप्त होईल.

धर्ममार्गेगतेसूर्येचंद्रेमोक्षगतेयदि ॥
गृहलाभोभवेत्तस्यविज्ञेयोनात्रसंशयः ३१

अर्थ- धर्ममार्गी सूर्य आणि मोक्षमार्गीचंद्र असतां त्या योगाचें फळ गृहलाभ व मार्गीं सुख प्राप्त होईल.

अर्थमार्गांचींफळें ॥ ॥ अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेधर्मास्थि
तेयदि ॥ गजलाभोभवेत्तस्यतत्रश्रीःसर्वतोमुखी ॥ ३२ ॥

अर्थ- अर्थमार्गी सूर्य आणि धर्ममार्ग नक्षत्रीं चंद्र अशा योगाचें फळ गजलाभ व लक्ष्मीप्राप्ति होईल.

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेतत्रैवसंस्थिते ॥ भयमंजायतेकार्येत-

त्रभंगोभविष्यति॥३३॥

अर्थ- अर्थमार्गी सूर्य आणि चंद्र आले अशा योगाचें फळ प्रथम कार्य सिद्धि होईल. नंतर भंग पावेल.

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेकामांशसंस्थिते॥
सर्वसिद्धिर्भवेतस्यजानीयान्नात्रसंशय:३४

अर्थ- अर्थमार्गी सूर्य आणि काममार्गी चंद्र आलातर अशायोगाचें फळ. सर्व कार्यसिद्धि होईल.

अर्थमार्गेगतेसूर्येचंद्रेमोक्षास्थितेयदि॥
भूमिलाभोभवेत्तस्य हर्षयुक्त:सुखीभवेत् ३५

अर्थ- अर्थमार्गी सूर्य आणि मोक्षमार्गी चंद्र अशा योगाचें फळ भूमि लाभ. व हर्षयुक्त होत्साता मार्गाचें ठायीं सुख पावेल असें जाणावें.

काममार्गाचीफळें॥ ॥काममार्गेगतेसूर्येचंद्रेधर्मेचसं-
स्थिते॥ गजाश्वाश्चविलभ्यंतेराजसन्मानसंभवात्॥३६॥

अर्थ- काममार्गी सूर्य आणि धर्ममार्गी चंद्र आलातर हत्ती, घोडे, यांचा लाभ, राजसन्मानापासून प्राप्त होईल.

काममार्गेगतेसूर्येचंद्रेचैवार्थसंस्थिते॥
सफलंजायतेतस्यविघ्नभंगोविनिर्दिशेत् ३७

अर्थ-काममार्गी सूर्य आणि अर्थमार्गी चंद्र आला असतां सकल विघ्ने नाश पाव०

काममार्गेगतेसूर्येचंद्रे तत्रैव संस्थिते॥ वि-
ग्रहंदारुणंचैव कार्यनाशंविनिर्दिशेत् ३८.

अर्थ- काम मार्गी सूर्य आणि चंद्र आलेतर वैर फारपडेल व कार्यनाशहो०

काममार्गेगतेसूर्येचंद्रे मोक्षगतेपिवा॥ राज
लाभोभवेत्तस्य स्वर्णलाभंविनिर्दिशेत्॥३९॥

अर्थ- काममार्गी सूर्य आणि मोक्ष मार्गी चंद्र आलातर राजापासून लाभ व सुवर्णलाभ होईल.

मोक्षमार्गाचीफळें॥ ॥मोक्षमार्गेगतेसूर्येचंद्रे धर्मस्थि
तेयदि॥हेमलाभोभवेत्तस्यसर्वकार्यंप्रसिद्ध्यति॥ ४०॥

अर्थ- मोक्षमार्गी सूर्य वधर्ममार्गीचंद्र आलातर सुवर्णलाभ आणिसर्व- कार्यसिद्धि होईल.

उत्तरार्ध.

मोक्षमार्गेगतेसूर्ये अर्थांशेचंद्रमायदि॥ विफ
लंतस्यकार्यंचचोरराजारिपोर्भयम्॥ ४१॥ श्री:

अर्थ- मोक्षमार्गी सूर्य व अर्थमार्गी चंद्र आलातर चोर, राजा, वशत्रु यां पासून भयप्राप्ति आणि कार्यनाश होईल.

मोक्षमार्गेगतेसूर्येचंद्रेकामास्थितेयदि॥ स-
र्वसिद्धिमवाप्नोतिकार्येचजयमेवच॥ ४२॥

अर्थ- मोक्षमार्गी सूर्य आणि काममार्गी चंद्र आलातर सर्वकार्यसिद्धि व जय प्राप्ति होईल.

मोक्षमार्गेगतेसूर्येचंद्रेतत्रैवसंस्थिते॥ वि
ग्रहंदारुणंचैवविघ्नस्तस्यभविष्यति॥ ४३॥

अर्थ- मोक्षमार्गी सूर्य आणि चंद्र आलातर वैर व नानाप्रकारें विघ्नें होतील असें जाणावें.

पंथाराहूवर कर्मे करावयाचीं.

यात्रायुद्धेविवाहेचप्रवेशेनगरादिषु॥ व्या-
पारेषुचसर्वेषुपंथाराहुः प्रशस्यते॥ ४४॥

अर्थ- यात्रेस जाण्यास व युद्धांत जाण्यास, विवाहास, नगरादिकांत प्रवेश करण्यास व व्यापारास पंथाराहु प्रशस्त होय.

गर्गादिकांचेमुहूर्त॥ ॥उषःप्रशंसतेगर्गः शकुनंचबृह
स्पतिः॥ अंगिरामनउत्साहं विप्रवाक्यं जनार्दनः॥ ४५

अर्थ- मागील पांच घटिका रात्र शेष राहिली म्हणजे उषःकाल होतो तो गर्गमुनीचे मतें प्रयाणास शुभ. व बृहस्पतीचे मतें उत्तम शकुन शुभ. अंगिराच्या मतें मनउत्साहकालीं शुभ आणि जनार्दन मतें ब्राह्मणाचें वाक्य शुभ होय.

शुभाशुभ वाहनें

आत्मनोजन्मनक्षत्रात्दिननक्षत्रमेवच॥ एकीकृत्वाह
रेद्भागंनंदशेषेचवाहनम्॥ ४६॥ रासभोऽश्वोगजोमेषोजंबु
कःसिंहसंज्ञकः॥ काकश्चैवमयूरश्चहंसइत्येववाहनम्॥ ४७
॥ फल ॥ रासभेअर्थनाशश्चधनलाभश्चवाजिनि॥ लक्ष्मी-

प्राप्तिर्गजाख्येचमेषेचमरणंध्रुवम् ॥ ४८ ॥ जंबू-
त्सलाभश्चकार्यसिद्धिश्चसिंहगे ॥ काकेचविफलंकार्यं
मयूरेचसुखावहम् ॥ ४९ ॥ हंसेतुसर्वसिद्धिःस्याद्वा-
हनानांफलंस्मृतम् ॥

**अर्थ-** आपल्या जन्मनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों मोजून त्यास नवानीं भागावें आणि शेष उरेल त्यावरून वाहनजाणावें. शेष १ उरेलतर वाहन गाढव, त्याचें फळ अर्थनाश, दोन उरले तर घोडा धनलाभ; ३ उरलेतर हत्ती, लक्ष्मीप्राप्ति ४ उरलेतर मेंढा मरण, ५ उरलेतर कोल्हा. स्वल्पलाभ. ६ उरलेतर सिंह कार्यसिद्धि. ७ उरले तर कावळा, निष्फळ ८ उरलेतर मयूर सुख प्राप्ति. ९ उ० हंस सर्वसिद्धि याक्रमानें वाहनें जाणा०

## त्र्यंकमुहूर्त.

तिथयः पक्षगुणिताः सप्तभिर्भाजितास्तताः ५० वाराः
स्युर्वन्हिगुणितावसुभिश्चैवभाजिताः ॥ चतुर्गुण्यानि
भान्यंकभाजितानियथाक्रमम् ५१ ॥

**अर्थ-** ज्यातिथीस गमन करावयाचें ती तिथि दुप्पट करून सातानीं भागावी. आणि जो वार असेल तो तिप्पट करून त्यास ८ नीं भागावें. जें नक्षत्र असेल तें चौपट करून ९ नीं भागावें. आणि तिहींचे शेषांक आल्यास शुभ. व तिहींचें शून्य आल्यास त्र्यंक नाहींत.

## फळश्रुति.

पीडास्यात्प्रथमेशून्येमध्येशून्येमहद्भयम् ॥ अं-
त्यशून्येतुमरणंत्र्यंकेचविजयीभवेत् ॥ ५२ ॥ श्रीः ॥

**अर्थ-** प्रथम तिथीचे भागास शून्य आलें तर पीडा. द्वितीयवाराचे भागास शून्य आलें तर मोठें भय. तिसरे नक्षत्रभागास शून्य आलें तर मरण आणि तिहीं ठिकाणीं अंक आले ह्मणजे त्र्यंक आहे तो विजयप्राप्ति करणारा जाणावा.

## भ्रमणाडळमुहूर्त.

सूर्यभाद्गणयेच्चांद्रंसप्तभिर्भागमाहरेत् ॥ त्रिषट्केभ्रमण
चैवद्विसप्तमहदाडलम् ॥ ५३ ॥ प्रथमंपंचचत्वारिआडळोनास्ति
निश्चितम् ॥ आडळेताडनंप्रोक्तंभ्रमणेकार्यनाशनम् ॥ ५४ ॥

अर्थ- सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों गणून ७ नीं भागून शेष ३ अथवा ६ उरलेतर त्या दिवशीं भ्रमण आहे. कार्यनाश. २ किंवा ७ उरले तर आडळ आहे तें गमनास वर्ज्य. ताडण करण्यास उक्त १।५।४ उरले तर आडळ नाहीं. गमनास उक्त जाणावें.

## हैवरमुहूर्त.

सूर्यभाद्गणयेच्चांद्रंपक्षादितिथिवारयुक ॥ नव
भिस्क हरेद्भागं सप्तशेषंतु हैवरम् ॥ ५५ ॥

अर्थ- सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतो गणून त्यांत पक्ष, तिथि, आणिवार मिळवून ९ नीभागून शेष ७ उरलेतर हैवर मुहूर्त आहे तो गमनास शुभ होय.

घबाडमु० ॥ ॥ सूर्यभाद्गणयेच्चांद्रंत्रिगुणांतिथिमिश्रि
तम् ॥ सप्तभिस्क हरेद्भागं त्रीणिशेषं घबाडकं ॥ ५६ ॥

अर्थ- सूर्यनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों गणून ती संख्या त्रिगुणित करून चालतीतिथि त्यांत मिळवून सातानीं भागावी. शेष ३ उरले तर घबाड मुहूर्त जाणावा.

## वारपरत्वें स्वरशकुन.

गुरोशनौरवौभौमेशुभोवैदक्षिणः स्वरः ॥ अन्यवारेषु
वामस्क स्वरश्चैव शुभः स्मृतः ॥ ५७ ॥ निर्गमेवामतः श्रेष्ठः
प्रवेशेदक्षिणः शुभः ॥ यःस्वरः सैवनासाग्रेयोगिनांमत
मीदृशम् ॥ ५८ ॥

अर्थ- गुरु, शनि, रवि, भौम या चहूं वारीं आपल्या नासिकेचा दक्षिण- स्वर वाहात असेल तर तो प्रवेशकरण्यास श्रेष्ठ होय आणि चंद्र, बु- ध, शुक्र या वारीं वामस्वर वाहात असेलतर तो निर्गमास श्रेष्ठ असें यो ग्यांचें मत आहे.

## वारपरत्वें पादच्छायायुक्तमुहूर्त

अष्टौपादाबुधेस्युर्नवधरणिसुते सप्तजीवेपदानिज्ञे-
यान्येकादशार्केशनिशशिभृगुजेत्वर्धयुग्वेदपादाः ॥
तस्मिन्काले मुहूर्ते सकलगुणयुते कार्यसिद्धिः शुभोक्ता
तस्मिन्पंचांगशुद्धिर्नखलुशशिबलंभाषितंगर्गमुख्यैः ५९

**अर्थ-** आठ पावलें आपली छाया झाली ह्मणजे बुधवारीं गमन करावें. ९ पावलें झाली ह्मणजे मंगळवारीं, ७ पावलें झाली ह्मणजे गुरुवारी, ११ पावलें झाली ह्मणजे रविवारीं, आणि ४॥ पावलें झाली ह्मणजे शनि, सोम, शुक्र ह्या तिन्ही वारीं गमन करावें. हा मुहूर्त सकलगुणयुक्त व सफल कार्यसिद्धि कर्ता होय. यास पंचांगशुद्धि व चंद्रबल इत्यादिक पाहण्याची गरज नाहीं. असें गर्गादि मुनि सांगतात.

### काकशब्दशकुन.

काकस्यवचनंश्रुत्वापादच्छायांतुकारयेत् ॥ त्रयोदशयुतांकृत्वाषड्भिर्विभागमाहरेत् ॥ ६०॥ फळ ॥ लाभः खेदस्तथा सौख्यंभोजनंचधनागमः ॥ अशुभंचक्रमेणैवगर्गस्यवचनंयथा ६१

**अर्थ-** काकशब्द ऐकून आपली छाया पादेंकरून मोजून त्यांत १३ मिळवावे. आणि त्यासंख्येस ६ नीं भागावें. शेष राहील त्याचें फळ १ उरलातर लाभ. २ उरलेतर खेद ३ उरलेतर सौख्य ४ उरलेतर भोजनप्राप्ति ५ उ०तर धनलाभ. आणि पूर्ण उरलेतर अशुभ जाणावें याप्रमाणें गर्गवचन आहे.

### पिंगलाशब्दशकुन.

उल्हासःकिल्बिलेचैवचिस्चिल्याभोजनंतथा ॥ बंधनंखिटिखिट्टीस्यात्कर्कुरशब्देमहद्भयम् ६२

**अर्थ-** किल्बिल शब्द जाहलातर उत्साह होय. चिस्चिल असा शब्द जाहलातर भोजनप्राप्ति. व खिटिखिट्टि असा शब्द जाहला असतां बंधन-होय. आणि कर्कुर असा शब्द जाहलातर महाभय जाणावें.

### शिंकापरत्वें पादच्छाया शकुन.

बुधैश्छिक्कारवंश्रुत्वापादच्छायांतुकारयेत् ॥ त्रयोदशयुतांकृत्वाचाष्टभिर्भागमाहरेत् ॥ ६३॥ फळ ॥ लाभःसिद्धिर्हानिशोकोभयश्रीर्दुःखनिष्फले ॥ क्रमेणैवफलंज्ञेयंगर्गेणचयथोदितम्

॥ ६४ ॥

**अर्थ-** शिंकाशब्द ऐकून आपली छाया पावलांनीं मोजून त्यांत १३ अंक मिळवून ८ नीं भागावी. शेष राहील त्याचें फळ. १ उरलातर लाभ. २ उरलेतरसिद्धि, ३ उरलेतर हानि, ४ उरलेतर शोक ५ उरलेतर भय. ६ उरलेतर

लक्ष्मी. सात उरले तर दुःख आणि पूर्ण उरलेतर निष्फळ असें गर्गमुनि सांगतात.

## दिशापरत्वें शिंकाशकुन.

शिंकाप्रश्नं प्रवक्ष्यामि पूर्वस्यामशुभं फलम् ॥ आग्नेय्यां शोकदुःखं स्याद्रिष्टं दक्षिणेतथा ॥ ६५ ॥ नैर्ऋत्यांच शुभं प्रोक्तं पश्चिमे मिष्टभक्षणम् ॥ वायव्यां धनलाभस्क उत्तरे कलहस्तथा ॥ ६६ ॥ ईशान्यांच शुभं ज्ञेयमात्मशिंका महद्भयम् ॥ ऊर्ध्वेचैव शुभं ज्ञेयं मध्येचैव महद्भयम् ॥ ६७ ॥ आसनेशयनेचैव दानेचैव तु भोजने ॥ वामांगे पृष्ठतश्चैव षट् छिंकाश्च शुभावहाः ॥ ६८ ॥ ॥

## अर्थ.

दिशापरत्वें शिंकेचीं फळें. पूर्वेची शिंका अशुभ आग्नेयीची शोक व दुःखकारक. दक्षिणेची अरिष्ट कारिणी. नैर्ऋत्येची शुभ. पश्चिमेची मिष्टान्न भक्षण वायव्येची धनदायक. उत्तरेची कलहकारक ईशान्येची शुभकारक, व आत्मशिंकेचें मोठें भय. उर्ध्व झालीतर शुभ, मध्यें झालीतर मोठें भय. आसनावर, शयनावर दानदेतां, भोजन करितां, वाम भागीं अथवा पृष्ठभागीं. या ६ स्थानींची शिंका शुभ होय.

## पल्लीशब्दशकुन.

धिन्नं ब्रह्मणि कार्यसिद्धिमतुलां शक्रे हुताशे भयं याम्ये मित्रवधः क्षयश्च निर्ऋते लाभः समुद्रालये ॥ वायव्यां वरमिष्टमन्नमशनं सौम्यार्थलाभस्तथा ईशाने गृहगोधिकार्यमतुलं सर्वत्र भूमौ बलं ६९

## अर्थ.

पल्लीच्या शब्दाचें दिशापरत्वें फळ सांगतो. ऊर्ध्वदिशेस लक्ष्मीप्राप्ती. पूर्वदिशेस कार्यसिद्धि, आग्नेयेस भय. दक्षिणेस मित्रवध. नैर्ऋत्येस क्षय. पश्चिमेस लाभ. वायव्येस मिष्टान्न भोजन. उत्तरेस लाभ. ईशान्येस कार्यसिद्धि. आणि भूमिवर शब्द जाहलाअसतां भय याप्रमाणें फळें जाणावीं.

## पल्लीपतन व सरटारोहण.

राज्यं तु शिरसि ज्ञेयं ललाटे बंधुदर्शनम् ॥ भ्रूमध्ये राजसन्मानऊर्ध्वोष्ठेच धनक्षयः ॥ ७० ॥ अधरोष्ठे धनेऽश्वर्यं नासांते व्याधिपीडनम् आयुष्यं दक्षिणे कर्णे बहुलाभस्कवामके ॥ ७१ ॥ अक्ष्णो

स्तुबंधनंज्ञेयंभूजेभूपतितुल्यता॥राजक्षोभंतथावामेकंठे शत्रुविनाशनम्॥७२॥स्तनहृयेचदौर्भाग्यमुदरेमंडनंशुभम्॥प्रज्ञानाशःपृष्टदेशेजानुजंघेशुभावहम्॥७३॥करहृयेवस्त्रलाभःस्कंधयोर्विजयीभवेत्॥नाभौबहुधनंप्रोक्तम्प्वेश्चैवहयादिकम्॥७४॥दक्षिणेमणिबंधेचमेनस्तापंधनक्षयम्॥मणिबंधेतथावामेकीर्त्तिवृद्धिधनप्रदम्॥७५॥नखेषुधान्यलाभंचवक्त्रेमिष्टान्नभोजनम्॥गुल्फयोर्बंधनंज्ञेयंकेशांतेमरणंध्रुवम्॥७६॥अध्वानंदक्षिणेपादेवामेबंधुविनाशनम्॥स्त्रीनाशःस्यात्पादमध्येपादांतेमरणंभवेत्॥७७॥पल्ल्याःप्रपतनंज्ञेयंसरठस्याधिरोहणम्॥यात्राद्युक्तमनुष्यस्यशुभाशुभविसूचकम्॥७८॥तिलमाषादिदानंचस्नात्वादेयंद्विजन्मने॥पिनाकिनंनमस्कृत्यजपेन्मंत्रंपडक्षरम्॥७९॥शतंसहस्रमथवासर्वदोषनिबर्हणम्॥
शिवालयेप्रदद्याद्वैदीपंदोषोपशांतये॥८०॥

## अर्थ.

मनुष्य गमनास उद्युक्त असतां अंगावर पल्लीपतन अथवा सरठारोहण झालें तर शरीर स्थानपरत्वें शुभाशुभसूचक अशीं फळें सांगतो.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ शिरावर | राज्यप्राप्ति | ११ वामबाहूवर | राजक्षोभ | २१ मांड्यावर | घोडावाहन |
| २ कपाळ | बंधुदर्शन. | १२ कंठावर | शत्रुनाश. | २२ उजव्या म० | धनक्षय. |
| ३ भिवया | राजसन्मान. | १३ स्तनावर | दौर्भाग्य. | २३ डावा मन० | कीर्ति. |
| ४ वरचा ओंठ | धनक्षय | १४ उदरावर | शुभमंडन | २४ नखावर | धान्यलाभ. |
| ५ खाल० ओंठ | धनऐश्व | १५ पृष्ठावर | बुद्धिनाश. | २५ मुखावर | मिष्टा० भोजन |
| ६ नाकावर | व्याधिपी० | १६ ढोंपरावर | शुभ | २६ गुल्फावर | बंधन. |
| ७ उजवा कान | आयुष्य. | १७ पोटऱ्यांवर | शुभ | २७ केशांवर | मरण. |
| ८ डावा कान | बहुलाभ | १८ दोन्ही हात | वस्त्रलाभ | २८ दक्षिणपाद. | मार्गचाल. |
| ९ नेत्रांवर | बंधन. | १९ खांद्यावर | विजय. | २९ वामपायांवर. | बंधुनाश |
| १० बाहूवर | राजासम. | २० नाभीवर | बहुधन. | ३० पायांचा मध्य. | स्त्रीनाश. |

याप्रमाणें पल्लीपतन फळें जाणावीं आणि पाल अंगावर पडली असतां सचैल स्नानकरून तिल उडीद इत्यादि दानें ब्राह्मणास द्यावीं. आणि सांबास.

नमस्कार करून शिवषडक्षर मंत्राचा जप ११००० करावा. व शिवालयांत दीप लावावा. म्हणजे दोषजातो.

## अंगस्फुरण.

मनुरुवाच ॥ ॥ ब्रूहिमेत्वंनिमित्तानि अशुभानिशुभानि च ॥ सर्वधर्मभृतांश्रेष्ठत्वंहि सर्वंविबुध्यसे ॥ ८१ ॥ ध्रु ॥

अर्थ- मनु प्रश्न करितो. हे धर्मधारक श्रेष्ठा, तूं मला शुभाशुभनिमित्तें सांग कारण तूं सर्व जाणतोस.

अंगस्यदक्षिणेभागेप्रशस्तंस्फुरणंभवेत् ॥
अप्रशस्तंतथावामेपृष्ठस्यहृदयस्यच ॥ ८२ ॥

अर्थ- अंगस्फुरण दक्षिणभागीं शुभ. वामभाग पृष्ठभाग व हृदय हीं अशुभस्थानें जाणावीं.

अंगानांस्पंदनंचैवशुभाशुभविचेष्टितम् ॥ तन्मेविस्तरतोब्रूहियेनस्यात्तद्विधंभवि ॥ ८३ ॥ मत्स्यउवाच ॥ पृथ्वीलाभोभवेन्मूर्ध्निललाटेरविनंदन ॥ स्थानंविवृद्धिमायातिभ्रूनसोःप्रियसंगमः ॥ ८४ ॥ भृत्यलब्धिश्चाक्षिदेशेदृगुपाते-धनागमः ॥ उत्कंठोपगमोमध्येदृष्टराज्यंविचक्षणेः ॥ ८५ ॥ दृग्बंधनेसंगरेचजयःशीघ्रमवाप्नुयात् ॥ योषिल्लाभोऽपांगदेशेश्रवणान्तेप्रियश्रुतिः ॥ ८६ ॥ नासिकायांप्रीतिसौख्यंप्रियाप्तिरधरोष्ठके ॥ कंठेतुभोगलाभःस्याद्रोगवृद्धिरथांसयोः ॥ ८७ सुहृत्स्नेहश्चबाहुभ्यांहस्तेचैवधनागमः ॥ पृष्ठेपराजयोत्सेधोजयोवक्षस्थलेभवेत् ॥ ८८ ॥ कुक्षिभ्यांप्रीतिरुद्दिष्टास्त्रियःप्रजननंभगे ॥ स्थानभ्रंशोनाभिदेशे आंत्रेचैवधनागमः ॥ जानुसंधोपरैःसंधिर्बलवद्भिर्भवेन्नृप ॥ एकदेशोभवेत्स्वामीजंघाभ्यांरविनंदन ॥ ९० ॥ उत्तमस्थानमान्योहिपद्भ्यांप्रस्फुरणेनृप ॥ अलाभंचोर्ध्वगमनंभवेत्पाद-तलेनृप ९१.

अर्थ.

मनु प्रश्न करितो कीं, अंगाची स्थानें स्फुरण पावलीं तर त्याचीं शुभाशुभ फलें विस्तारें करून सांग? मत्स्य सांगतो.-

१ मस्तक स्फुरण - पृथ्वीलाभ.
२ ललाट - स्थानांचीवृद्धि.
३ भिवयांचें मध्य - प्रियांचीभेट
४ नेत्रांजवळ - चाकरमिळतील.
५ पापण्यास्फुरण - धनप्राप्ति.
६ कंठमध्य - राज्यप्राप्ति.
७ दृग्बंधन - युद्धांतजयमिळेल.
८ अपांगदेश - स्त्रीलाभ.
९ कर्ण - प्रीतीचीं भाषणें ऐकूंयेतील
१० नासिक - प्रीतिसौख्यप्राप्ति.
११ अधरोष्ट - प्रियकरवस्तुप्राप्ति
१२ कंठ - ऐश्वर्य प्राप्ति
१३ खांदे - भोगवृद्धि प्राप्त होईल.
१४ दोन्हीबाहु - सुहृत्संबंधीयांचीभेट
१५ दोन्हीहात - धनप्राप्ति.
१६ पृष्ठ - दुसऱ्यापासून जय होईल.
१७ ऊर - जयप्राप्ति.
१८ कुक्षिस्फुरण - प्रीति
१९ शिश्न - स्त्रीप्राप्ति.
२० नाभिस्फुरण - स्थानभ्रंश.
२१ आंतडी - धनप्राप्ति.
२२ दोंपरें - संधि उपसंधि यातिहीं चें बळकटत्व.
२३ पोटऱ्या - एकदेशाची प्राप्ति.
२४ पाय - उत्तमस्थानींमान्यता होईल
२५ तळवे - पायांचें गमन होईल.

## स्त्रियांचें अंगस्फुरण.

लांछनंपीटकंचैवज्ञेयंस्फुरणवत्तथा॥ विपर्ययेणविहितःसर्वस्त्रीणांविपर्ययः॥ दक्षिणेंऽपिप्रशस्तेंगंप्रशस्तस्याद्विशेषतः ९२

**अर्थ-** स्त्रियांचें अंगस्फुरण भिवयांचे मध्यें गोंधलें कादितात तें स्थानतशींच हीं सर्व मागें स्फुरणस्थानें सांगितलीं परंतु तींच स्थानें स्त्रियांस विपरीत धरून सांगावीं ह्मणजे स्त्रियांचें वामांग शुभ असें जाणावें.

अनन्यथासिद्धिरजन्मनःस्यात्फलस्यशस्तस्यचनिंदितस्य॥ अनिष्टचिन्होपगमेद्विजानांकार्यंसुवर्णेनतुतर्पणंस्यात ९३

**अर्थ-** अंगस्फुरणाचें फल बरें किंवा वाईट असेल तें अन्यथा होत नाहीं. अनिष्ट निमित्त झाल्यास सुवर्णदान करावें.

## नेत्रस्फुरण.

नेत्रस्योर्ध्वंहरतिसकलंमानसंदुःखजालंनेत्रोपांतेदिशतिचधनंनासिकांतेचमृत्युः॥ नेत्रस्याधःस्फुरणमसकृत्संगरेभंगहेतुर्वामेचैतत्फलमविफलंदक्षिणेवैपरीत्यम्॥९४॥

## स्त्रीणांविपर्ययः

अर्थ- नेत्राचीं ऊर्ध्व प्रांतादि स्थानें स्फुरण होतात त्यांचीं फळें सांगतों. नेत्राच्या वरील पापण्या स्फुरणझाल्यातर मनाचें दुःख जाईल. आणि धन प्राप्ति होईल. नासिकाजवळची बाजू स्फुरण झाली तर मृत्यु. अधर प्रांत स्फुरण झाला तर युद्धांत अपजय. हीं सर्व फळें वामनेत्राचीं घ्यावीं दक्षिणनेत्राचीं विफळ आणि स्त्रियांचीं दक्षिण नेत्राचीं घ्यावीं. वाम नेत्राचीं विफळ होत.

## त्रिशूलयंत्र

रोगिणश्चकुलाद्यर्क्षीदिनाद्यर्क्षेचयुद्ध्यतः॥ ह्यन्यका गमनेदद्यादन्यत्ररविदीयते॥९५॥

अर्थ- रोग्याचे प्रश्नास त्रिशूल-मध्याग्रीं मंगळ ज्या नक्षत्रीं असेल तें द्यावें. आणि चंद्रज्या स्थानीं यंत्रांत येईल तें फळ घ्यावें. या प्रमाणें पुढील क्रम जाणावा. युद्धांत जाणें तर दिन नक्षत्रापासून सूर्य नक्षत्रापावेतों आणि अन्यकर्मास सूर्य नक्षत्रापासून दिननक्षत्रा पावेतों असा क्रम जाणावा.



त्रिशूलाग्रेभवेन्मृत्युर्मध्यमंबाहिरष्टकम्॥ लाभंक्षेमंजयारोग्यंचंद्रगर्भेषुसंस्थितम्॥९६॥ ॥

अर्थ- त्रिशूल अग्रभागीं दिननक्षत्र आलें तर मृत्यु. बाहेरील अष्टकांत आलें तर मध्यम आणि मध्य अष्टकांत आलें तर लाभ. क्षेम, जय आणि आरोग्य, हें सर्व संमत जाणावें.

॥ ॥गमनासलग्नें॥ ॥चरलग्नेभयातव्यंद्विस्वभावेनथानरैः॥लग्ने

स्थिरेनगंतव्यंयात्रायांक्षेममीप्सुभिः॥१७॥

अर्थ- चर म्हणजे मेष, कर्क, तूळ, मकर, हीं चार लग्नें व द्विस्वभाव म्हण जे मिथुन, कन्या, धन, मीन हीं ४ अशीं ८ लग्नें गमनास उक्त होत. कार्य सफल होय. आणि शेष राहिलीं तीं लग्नें वर्जावीं.

दुसरालग्नाचाप्रकार.

लग्नेकार्मुकमेषतौलिगमनेकार्येविलंबोनृणांपंचत्वंमक रेतथैवचघटेनहत्फलंवृश्चिके॥सिंहेकर्कटकेवृषेपरिग तः सर्वार्थसिद्धिंलभेत्कन्यामीनगतस्तथैवमिथुनेसौ- ख्यंशुभान्नंवसु॥१८॥श्री॥

अर्थ- धन, मेष, तूळ, या तिन्हीं लग्नीं गमन केलें तर विलंबें करून का- र्य होईल, मकर कुंभ वृश्चिक हीं लग्नें मृत्युकारक. सिंह, कर्क, वृषभ हीं. लग्नें कार्यसिद्धि करणारीं होत. आणि कन्या, मीन, मिथुन, हीं तिन्हीं ल ग्नें सौख्यकारक, शुभ आणि धन व धान्य देणारीं अशीं आहेत १८

गमनलग्नींद्वादशस्थानपरत्वें

ग्रहबल पाहणें.

प्रथमस्थान॥ ॥जन्मस्थंचाष्टमंत्याज्यंलग्नेद्वादशमेवच ॥ग्रहाणांचबलंवीक्ष्यगच्छेद्दिग्विजयंनृपः॥१९॥ ॥

अर्थ- लग्नीं, अष्टमस्थानीं. आणि द्वादशस्थानीं पापग्रह वर्ज्य करून ग्रह बल घेऊन गमन करावें. दिग्विजय कार्यसिद्ध होय.

स्थानेयदास्युर्गुरुसौम्यशुक्राः सिध्यंतिकार्याणि- चपंचमेन्हि॥राज्यास्पदंवासुखदेशलाभंमासस्य मध्येग्रहभावयुक्तम् २००॥

अर्थ- लग्नीं गुरु अथवा बुध, शुक्र असले तर ५ दिवसांत अथवा एक मासांत राज्य पद, सुख किंवा देशलाभ प्राप्त जाणावा.

द्वितीयस्थानाचेंफळ॥ ॥जीवोबुधोवाभृगुनंदनोवा- स्थानेद्वितीयेगमनस्यकाले॥सुवस्त्रलाभंचतुरंगला- भंमासस्यमध्येचचतुर्दशेन्हि॥१॥श्रीशंकरस॥ ७॥

अर्थ- द्वितीयस्थानीं गुरु, बुध, अथवा शुक्र असे असले तर वस्त्र आ णि तुरंगलाभ एके मासामध्यें, चवदावे दिवशीं प्राप्त होतील अ० जाणावें.

## उत्तरार्ध.

क्रूराधनस्थारविराहुभौमाःसौरिश्चकेतुस्त्रिभिरेवमासैः ॥ वित्तस्यनाशंचददातिमृत्युं सत्यंहिवाक्यंमुनयोवदंति ॥ २ ॥

अर्थ- द्वितीय स्थानीं रवि, राहु, मंगळ, शनि आणि केतु याक्रूर ग्रहांतून कोणताही ग्रह असला तर तीन मासांत मृत्यकारक आणि वित्तनाशक होतो. हें सत्यवाक्य मुनि बोलतात.

### तृतीयस्थानाचें फळ.

स्थानेतृतीयेगुरुभार्गवौच सोमस्यसूनुश्चनिशापतिश्च ॥ करोतिकार्यंसफलंचकार्यंपक्षद्वयेनापिदिनत्रयेण ॥ ३ ॥

अर्थ- तृतीयस्थानीं गुरु, शुक्र, चंद्र अथवा बुध असले तर १ मास अथवा तीन दिवसांत कार्य सफल होईल.

### चतुर्थस्थान.

क्रूराश्चतुर्थेगमनेचकुर्यान्नश्येच्चशेषं शुभदंचकार्यं ॥ तत्रापिदैवनभवेच्चसिद्धिर्मासत्रयेणापिदशाहमध्ये ॥ २०४ ॥

अर्थ- क्रूरग्रह वर सांगितले आहेत त्यांतून कोणताही ग्रह चतुर्थस्थानीं वर्ज करून शेषग्रह राहिले ते असतां शुभ. परंतु दैवयोगें करून तीन मास १० दिवसांत कार्यसिद्धि होईल किंवा नाहीं होणार अ. सम.

पंचमस्थान ॥ ॥ भृगुर्गुरुश्चंद्रबुधौयदास्युः शुभेचलग्नेतुसुतेचयुक्ताः ॥ कुर्वंतिकार्यस्यचासिद्धिमिष्टांमासद्वयेनापिवदंतिसत्यम् ॥ ५ ॥

अर्थ- गुरु, शुक्र, चद्र अथवा बुध ह्या चार ग्रहांतून पंचमस्थानीं ग्रह असतां शुभ होय २ मासांनीं इष्ट कार्यसिद्धि होईल.

षष्ठस्थान ॥ ॥ जीवश्चशुक्रश्चबुधश्च षष्ठे करोतियात्रासुफलंविलग्नात् ॥ पक्षद्वयेनापिवदंतिसत्यंसौम्यर्क्षसंस्थः सबलश्चचंद्रः ॥ ६ ॥

अर्थ- गुरु, शुक्र अथवा बुध यांतून ग्रह षष्ठ स्थानीं असला तर यात्रा सफल आणि मृगनक्षत्रींचा चंद्र त्या स्थानीं सबल असतां. एकमासा

नेकार्यसिद्धि जाणावी

## सप्तमस्थान.

चेत्सप्तमस्थागुरु सोमसौम्याः कुर्वंतियात्राविजयंनृपाणाम्॥ सर्वेनृपास्तस्य भवंति वश्यामासद्वयेनापिच पंचभिर्दिनैः ७॥

अर्थ- सप्तमस्थानीं गुरु, सोम अथवा बुध हे असतां विजय होय. २ मास पांच दिवसांत सर्व राजे वश होतील.

अष्टमस्थान॥ ॥क्रूराश्चसर्वेयदिलग्नकालेमृत्कास्थितामृत्युकराव दंति ॥ सौम्यागुरुर्वाभृगुनंदनश्च दीर्घायुषंमृत्यकरश्चचंद्रः॥८॥

अर्थ- क्रूर म्हणजे शनि, रवि, भौम, राहु, केतु यांनून ग्रह अष्टमस्थानीं असतां मृत्यकारक. आणि हे नसतां सौम्यग्रह असलेतर आयुष्याची वृद्धि करणारे होत. परंतु चंद्र नसावा तो मृत्युकारक होय.

नवमस्थान॥ ॥ धर्मस्थितायदिभवंतिहिपापखेटाः प्रयाणकालेच तथैवचंद्रमाः॥ तदाजयोवैसबलेचचंद्रेमासत्रयेणापिदिनैश्चतुर्भिः॥९॥

अर्थ- नवमस्थानीं पापग्रह असतां उक्त परंतु चंद्रबळ असावें म्हणजे तीन मास चार दिवसांत कार्यसिद्धि होईल.

धर्मस्थितोवायदिजीवशक्रौसोमस्यसूनुर्यदिलग्नकाले॥लग्नेचरेवायदिवास्थिरेवाकार्यस्यसिद्धिश्चभवेच्चलाभः॥२१०॥.

अर्थ- नवम स्थानीं गुरु, शुक्र, अथवा सोम, बुध हे चरलग्नस्थित किंवा स्थिरलग्नीं असतां कार्यसिद्धि होईल.

कर्मस्थान॥ ॥कर्मस्थिताःपापखगास्तुसौम्याः कुर्वंतिकार्यं शनिवर्जिताश्च॥लग्नेचरेवायदिवास्थिरेवामासत्रयेणापिच चैकमासः ११

अर्थ- दशमस्थानीं शनि वर्जकरून पापग्रह व सौम्यग्रह असतां चर अथवा स्थिर लग्नीं उक्त ३ किंवा १ मासांनीं कार्यसिद्धि होईल.

## लाभस्थान.

लाभस्थितोगुरुबुधोभृगुनंदनोवाक्रूराश्चसर्वेशशिनेवयुक्ताः॥सद्यःफलासिश्चभवेद्धियात्रा पक्षैकमध्येदिवस-

त्रयेच ॥ १२ ॥

**अर्थ**- एकादशस्थानीं रवि आदिकरून पापग्रह चंद्रासहित अथवा गुरु आदिकरून सौम्यग्रह असतां १ पक्ष ३ दिवसांत कार्यसिद्धि होईल.

व्ययस्थान.

सर्वेशुभाद्द्वादशसंस्थिताश्चेद्यात्राभवेत्तत्राविचित्रलाभः ॥ पापाश्चसर्वेव्ययदाभवंतियात्राफलंगर्गमुखैःप्रणीतम् १३

**अर्थ**- द्वादशस्थानीं शुभग्रह असतां यात्रा सांग होऊन तीन विचित्र लाभ होय आणि पापग्रह त्या स्थानीं असतां यात्रा व्ययप्रद होईल. असें गर्गमुनि सांगतात.

प्रस्थानठेवणें.

शुभमुहूर्तेस्वयंगमनासंभवेप्रस्थानंकार्यम् ॥
यज्ञोपवीतकंशस्त्रंमधुंचस्थापयेत्फलम् ॥
विप्रादिक्रमतःसर्वैःस्वर्णधान्यांबरादिकं ॥ १४ ॥

**अर्थ**- शुभमुहूर्तावर गमनकरण्याचा असंभव आहे तर प्रस्थानीं वस्तु ठेवणें त्या वर्णपरत्वें सांगतो. ब्राह्मणानें यज्ञोपवीत, क्षत्रियानें शस्त्र, वैश्यानें मधु, आणि शूद्रानें फळ याक्रमानें जाणावें आणि सर्व वर्णांस सुवर्ण, धान्य, वस्त्र, हीं उक्त होत.

प्रस्थान कितीदिवस उपयोगीं पडतें तें.

राजा दशाहं पंचाहमन्योन्यः प्रस्थितोवसेत् ॥ अंगप्रस्थानसंपूर्णवस्त्रप्रस्थानकेऽर्धकम् ॥ २१५ ॥ ७ ॥

अर्थ.

राजास प्रस्थान ठेविल्यापासून १० दिवस आणि अन्यांस ५ दिवस तो मुहूर्त उपयोगीं पडतो. परंतु वस्त्रप्रस्थानीं अर्ध फळ जाणावें. आणि अंगप्रस्थानीं संपूर्ण फल होय.

प्रस्थान कितीदूर ठेवावें त्याचें प्रमाण- ॥ गेहाद्गेहांतरंगर्गःसीम्नःसीमांतरंभृगुः ॥ बाणक्षेपंभरद्वाजोवसिष्ठोनगराद्बहिः ॥ प्रस्थानेपिकृतेनेयात् महादोषान्वितेदिने ॥ ११६ ॥

**अर्थ**- गर्गाचे मतें दुसऱ्याचे घरीं, भृगुचें मतें सीमेचे अंतीं, भरद्वाजाचे मतें नगराबाहेर, वसिष्ठाचें मतें बाणसोडल्यावर तो ज्या ठिकाणीं जा-

ऊन पडतो तितकें लांब प्रस्थान ठेवावें. या प्रमाणें शुभ दिनीं शुभवेळेस प्रस्थान ठेवलें तरीं गृहांतून निघणें महादोषयुक्त दिवशीं करूं नये.

प्रयाण दिवशीं वर्ज्य पदार्थ.

क्रोधक्षौररतिश्रमामिषगुडघृताश्रुदुग्धासवक्षाराभ्यं गभयासितांबरवमीस्तैलकटूंझ्झेद्रुमं॥ क्षीरक्षौररतीः क्रमाच्त्रिशरसप्ताहंपरंतद्दिनेरोगंरुग्यार्तवकंसितान्यति लकंप्रस्थानकेपीतिच ॥१७॥

अर्थ- क्रोध, क्षौर, स्त्रीसंग, आयास, मांस, गूळ, घृत, रुदन, दूध, मद्य, क्षार, अभ्यंग, अन्य विषयक प्रीति, शुभ्रवर्णावांचून अन्यवर्णांचें वस्त्र, वमन, तेल, तिखट, इतके पदार्थ प्रयाणदिवशीं वर्ज करावें आणि त्यांतून दूध, क्षौर, स्त्रीसंग हे क्रमानें ३।५।७ दिवस प्रयाण दिवसापासून पूर्वीं वर्ज करावे. आणि त्या दिवशीं शरीरीं रोगोद्भव, स्त्री रजस्वलात्व आणि शुभ्रातिरिक्त तिलक हेही वर्जावे. व याच प्रकारें सुमुहूर्तीं प्रस्थान ठेवलेल्या दिवशीं हीं वर्ज्य.

॥ मात्स्योक्त दुष्ट शकुन ॥ ॥

औषधेनतुयुक्तानिधान्यंकृष्णंतुयद्भवेत् ॥कार्पासश्चतृणंशुष्कं शुष्कंगोमयमेवच ॥ १८ ॥ श्रीराम ॥.

अर्थ- औषध युक्तमनुष्य, काळें धान्य, कापूस, वाळलेलें गवत, गोंवऱ्या हे दुष्ट शकुन होत.

इंधनंचतथांगारंगुडसर्पिस्तथाशुभम्
अभ्यक्तोमलिनोमंदस्तथानग्नश्चमानवः १९

अर्थ- काष्टें, भस्म, गूळ, तूप, दुष्टपदार्थ, अभ्यंग केलेला मनुष्य, मलिन, मंद, नग्न मनुष्य, हे वाईट.

मुक्तकेशोरुजार्तश्चकाषायांबरधारिणः॥
उन्मत्तः कंथितोसत्वोदीनोवाथनपुंसकः २०

अर्थ- मोकळे केशांचा मनुष्य, रोगी, भगवीं वस्त्रें धारण केलेला, उन्मत्त, कंथायुक्त, पापपुरुष, दीन व नपुंसक हे सर्व काळ वाईट

अयःपंकस्तथाचर्मकेशबंधनमेवच ॥ तथैवोद्धृतसारंच पिण्याकादितथानच॥ २१ ॥ ६॥

अर्थ-

लोखंड, निखल चर्म, केश बंधन, ताक, पेंड, हे दुष्ट शकुन जाणावे.

चांडालःशवमुक्तश्चराजबंधनपालकाः॥वध
काःपापकर्माणिगर्भिणीस्त्रीतथैवच॥२२२॥

अर्थ- चांडाल, प्रेतमुक्त, बंदिवान, वध कर्ते, पापीपुरुष, गर्भिणी स्त्री हे वाइ०

तुषंभस्मकपालास्थिभिन्नभांडानियानि-
च॥रक्तानिचैवभांडानिमृतसारंगएवच॥
एवमादीनिचान्यानि अप्रशस्तानि दर्श-
ने॥२२३॥

अर्थ- तूस, भस्म, कपालास्थि, फुटकीं भांडीं आणि तांब्याचीं भांडीं मृत सारंगपक्षी हे गमन कालीं दुष्ट शकुन झाले तर गमन वर्जावें.

क्वयासितिष्ठआगच्छकिंतेतत्रगतस्यतु॥
अन्यशब्दाश्चयेनिष्टास्तेविपत्तिकराअपि २४

अर्थ- कोठें जातोस? उभा रहा. इकडे ये. त्या ठिकाणीं तुझें काय काम आहे असे शब्द आणि अन्य अनिष्ट शब्द कोणी बोलल्यास विपत्तिका० होत.

ध्वजादौवायसास्थानंक्रव्यादानंध्विगर्हि
तं॥स्खलनंवाहनानांचवस्त्रसंगस्तथैवच २५

अर्थ- ध्वज, पताकावर काक बसलेला आणि अग्निदान, वाहन पतन, व वस्त्र नेसत असा पुरुष अशुभ.

दृष्टेनिमित्तेप्रथमेअमंगल्यविनाशनम्॥
केशवंपूजयेद्विद्वान्स्तवेनमधुसूदनम् २६

अर्थ- गमन समयीं वर सांगितलीं त्यांतून प्रथम अमंगळ दृष्टीस आलें तर नाश कारक होय. याचे निवारणार्थ विष्णूची पूजा आणि मधु सूदनाचा स्तव करावा.

द्वितीयेचततोदृष्टेप्रतीपेप्रविशेद्गृहम्॥ अ-
थेष्टानिप्रवक्ष्यामिमंगलानितथानघ॥२७

अर्थ- दुसऱ्या वेळेस कुशकुन दृष्टीस पडले तर घरांत यावें. त्यावेळीं यात्रेस जाऊं नये. आतां शुभ शकुन सांगतों.

गमनकाळींउत्तमशकुन॥ ॥प्रशस्तोवाद्यशब्दश्चभिन्नमे-

रीरवास्तथा ॥ पुरतः शब्द एहीनिशस्यतेनतुपृष्ठतः ॥
गच्छेतिचैवपश्चाद्यः पुरस्ताद्भुविगर्हितः ॥ २८ ॥ छ ॥

**अर्थ-** गमनकाळीं प्रशस्त शकुन, वाद्यांचे शब्द निरनिराळे नगऱ्याचे शब्द, शुभ व आपल्या पुढें कोणी मनुष्यानें ये असा शब्द म्हटल्यास शुभ. पाठीमागें वाईट व जा असा शब्द पाठीमागें शुभ पुढें वाईट अ० जाणावें.

श्वेताः सुमनसः श्रेष्ठाः पूर्णकुंभस्तथैवच ॥ जलजाः
पक्षिणश्चैवमत्स्यपाशाश्च पार्थिव ॥ २२९ ॥ श्रीः ॥

**अर्थ-** पांढरीं पुष्पें, पूर्णकुंभ, जीवंतमासे, पक्षि, मत्स्याचे पाश, असे शुभहोत असें जाणावें.

गावस्तुरंगमोनागो वृद्ध एकः पशुस्त्वजा ॥ त्रिदशाः
सुहृदोविप्राः ज्वलितश्च हुताशनः ॥ २३० ॥ श्रीः ॥

**अर्थ-** गाय, घोडा, हत्ती, वृद्ध एक, पशु, शेळी, देव, सोयरे, ब्राह्मण, ज्वलित अग्नि.

गणिकाच महाभाग दूर्वाश्चार्द्राश्च गोमयम् ॥ रु-
क्मंरूप्यंच ताम्रंच सर्वरत्नानि चाप्यथ ॥ ३१ ॥ छ ॥

**अर्थ-** कलावंतीण, ओल्या दूर्वा, शेण, सोनें, रुपें, तांबें आणि सर्व रत्नें ३१

ओषधानिच सर्वज्ञ यवाः सर्वार्थिकास्तथा ॥ खड्ग-
पात्रंपताकाच मृदमायुधपीठकम् ॥ ३२ ॥ छ ॥

**अर्थ-** औषधीं, सुज्ञ, पुरुष, यव, पांढऱ्या मोहऱ्या, खड्गपात्र, पताका, मृत्तिका, आयुध, आसन.

राजलिंगानि सर्वाणि शवंरुदितवर्जितम् ॥ घृ-
तंदधिपयश्चैव फलानिविविधानिच ॥ ३३ ॥

**अर्थ-** राजचिन्हें, रुदन वर्जित शव, तूप, दहीं, दूध, नानाप्रकारचा

स्वस्तिवर्धयमानंच नंद्यावर्त्तसकौस्तुभम् ॥ वा
दित्राणां शुभः शब्दो गंभीरः सुमनोहरः ॥ ३४ ॥

**अर्थ-** आशीर्वाद शब्द आणि शंख, कौस्तुभमाणि, उत्तमवाद्यें चांगले मनरंजन करणारे शब्द विघ्ननाशक.

गांधारषडजऋषभाद्ये गीताः सुस्वराः स्वराः ॥ वायु
सशर्करोत्सुष्णः सर्वविघ्नविनाशकृत् ॥ ३५ ॥ ...नप्राप्ति

**अर्थ-** गांधार, षड्ज, ऋषभ, हे राग सुस्वर गात असतां व वायु चां गला, मधुर अथवा उष्ण सर्व विघ्ननाशक होय.

प्रतिलोमस्तथानीचोविज्ञेयोभयकृद्विजः॥
अनुकूलोमृदुःस्निग्धः सुखस्पर्शः सुखावहः ३६

**अर्थ-** संकरजातीचा पुरुष, तसाच नीच मुसलमानादि, मोठा भयकर ब्राह्मण, आपणास अनुकूल पदार्थ, चांगलें आणि सुखस्पर्शित मनुष्यादिक हे सुखावह होत.

शस्तान्येतानि धर्मज्ञ यत्रस्यान्मनसः प्रियम्॥
मनसस्तुष्टिरेवात्र परमंजयलक्षणम्॥ ३७॥

**अर्थ-** हे शकुन सांगितले ते प्रशस्त. हे धर्मज्ञा, यांत आपले मनास प्रिय असेल त्याचें दर्शन फार उत्तम तुष्टिकारक व जयदेणारें होय.

मनोत्सुकत्वंमनसः प्रहर्षः शुभस्यलाभोविजय
प्रवादः॥मांगल्यलब्धिश्रवणंचराज्ञोज्ञेयानिनि
त्यंविजयावहानि ३८

**अर्थ-** गमनकालीं मनास उत्कंठा व हर्ष शुभलाभ, विजयकारक वाक्ये व मांगल्यप्राप्तिकारक वाक्यांचें श्रवण अशा शुभसूचक शकुनावर गमन केलें असतां राजास नित्य विजयावह होय.

क्षेमंकरनीलकंठाश्वोलूकखरजंबुकाः॥ प्र-
स्थानेवामतः श्रेष्ठाः प्रवेशेदक्षिणाः शुभाः ३९

**अर्थ-** मयूर, अश्व, उलूकपक्षी, गाढव, कोल्हा, हे प्रस्थान समयीं वामभागीं घेऊन गमन करावें. आणि प्रवेशास दक्षिण भागीं घ्यावें शुभ हो.

अथ आनंदादिशुभाशुभ योग.

सूर्येश्विभाद्विमनरोचिषिचंद्रधिष्ण्यात् सार्पाच्चभू-
मितनयेच्चबुधेचहस्तात्॥ मैत्राद्गुरौभृगुसुते ख-
लु वैश्वदेवान्छायासुतेवरुणभात्क्रमशः स्युरेव
॥ ४०॥ आनंदः कालदंडश्च धूम्राख्योऽथ प्रजा
पतिः॥ सौम्योध्वांक्षोध्वजोनाम श्रीवत्सोवज्र-
मुद्गरः॥ ४१॥
छत्रोमैत्रोमानसश्च पद्माख्योलंबकस्तथा॥

